

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन



अनुक्रमणिका

५३५८

संपादक वा. रा. ढवळे

सन १९६३-१९६४

३६ : १४५, १४६-४७; ई

३७ : १४८, १४९, १५०-५१

संपादक वा. रा. ढवळे

वर्ष ३६, अंक १४५ एप्रिल-मे-जून १९६३ (ऑगस्ट ६३)

वर्ष ३६ अंक १४६-१४७ जुलै ते डिसेंबर १९६३

संपादक - प्रा. श्री. के. क्षीरसागर

वर्ष ३७ अंक १४८ जानेवारी ते मार्च १९६४

वर्ष ३७ अंक १४९ एप्रिल ते जून १९६४

(वाङ्मय-समालोचन विशेषांक)

वर्ष ३७ अंक १५०-१५१ जुलै ते डिसेंबर १९६४

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

संपादक - वा. रा. ढवळे

वर्ष ३६

अंक १४५

ऑगस्ट १९६३

## या अंकात



अनुक्रमणिका











महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ३६ : अंक १४५ एप्रिल-मे-जून, १९६३

## संपादकीय

या अंकापासून म. सा. पत्रिका ही ३६ व्या वर्षात पदार्पण करीत आहे. काही तांत्रिक व व्यावहारिक सोयी-साठी पत्रिकेच्या आकारात व स्वरूपात थोडा बदल करावा असे संपादकमंडळाला बरेच दिवस वाटत होते. हा बदल वर्षारंभ अंकापासून केला तर अनेक दृष्टींनी ते सोयीचे होईल म्हणून तो या अंकापासून आम्ही करीत आहो. पत्रिकेचे नवे स्वरूप सर्वांना स्वागतार्ह वाटेल असा विश्वास वाटतो.

### वाङ्मयेतिहासाची योजना

मराठी वाङ्मयाच्या इतिहासाची योजना परिषदेमार्फत कार्यान्वित होण्याबाबत आज पहिले महत्त्वाचे पाऊल पडत आहे. सन १८०१–१८७४ या कालखंडातील मराठी वाङ्मय आधुनिक मराठी वाङ्मयाची पायाभरणी मानावी लागेल. वाङ्मयाचे प्रकार आणि विषय या दोन्ही दृष्टींनी मराठीने एक नवे वळण या काळात स्वीकारले आणि याचेच प्रौढ आणि परिणत स्वरूप आपल्याला निबंध-मालेच्या रूपाने व नंतरच्या वाङ्मयविकासाच्या रूपाने दिसू लागले. अशा या कालखंडातील साहित्याचा इतिहास योजनेतील चौथा खंड म्हणून पूर्ण तयार झालेला आहे, व लवकरच तो मुद्रित स्वरूपात वाचकांना उपलब्ध होईल.

### प्रा. रा. श्री. जोग

या खंडाचे मुख्य संपादक प्रा. रा. श्री. जोग हे आहेत. वाङ्मयाचे अध्यापन आणि समीक्षा-शास्त्रासंबंधीचे लेखन या दोन्ही क्षेत्रांत त्यांचा अधिकार फार मोठा आहे आणि म्हणूनच अनेक उप-संपादकांना मार्गदर्शन करून त्यांनी संपादित केलेला हा इतिहास-खंड प्रमाणभूत ग्रंथ म्हणून मान्य होईलच. १५ मे १९६३ रोजी त्यांच्या वयाला ६० वर्षे पूर्ण झाली. अनेक वर्षे अध्यापन कार्य करून ते सेवानिवृत्त झाले आहेत व निवृत्ती, नंतर आपल्या व्यासंगाला ते आता पूर्ण वेळ आणि शक्ती देत आहेत. त्यांच्या शिष्यांनी व मित्रांनी त्यांना गौरव-ग्रंथ काढण्याची योजना आखली असून त्यात परिषदही आनंदाने सहभागी होत आहे. प्रा. जोग यांनी परिषदेचे अध्यक्षपद व कार्याध्यक्षपद भूषविले असून पत्रिकेच्या संपादनाचे कार्यही केलेले आहे. परिषदेच्या इतिहास-योजनेचे व संशोधन-विभागाचे ते आधारस्तंभच आहेत. त्यांच्या वाङ्मयीन कार्यासंबंधीचा डॉ. द. न. गोखले यांचा एक लेख प्रस्तुत अंकात दिलेला आहे.

पत्रिकेच्या वाचकांच्या आणि संपादकांच्या वतीने आम्ही त्यांचे अभीष्टचिंतन करितो.

अनुक्रमणिका

## गुणगौरव

**डॉ. शं. दा. पेंडसे** आणि डॉ. वा. दा. गोखले यांना सेवानिवृत्तीनंतर संशोधन कार्य चालू ठेवण्यासाठी नागपूर आणि नाथीबाई ठाकरसी विद्यापीठांकडून निवडण्यांत आले असून युनिव्हर्सिटी ग्रँट्स कमिशनतर्फे वर्षासन मिळाले आहे. परिषदेशी या दोघांचे संबंध जवळचे आणि जिव्हाळ्याचे आहेत.

डॉ. शं. दा. पेंडसे यांनी माजीसंमेलनाध्यक्ष, परिषदेचे अध्यक्ष व कार्यकारणीचे सभासद या नात्याने परिषदेची बहुमोल सेवा केली आहे.

डॉ. वा. दा. गोखले यांनी परिषदेचे कार्यवाह यानात्याने सतत १२ वर्षे अत्यंत निष्ठेने काम केले. आजही ते म. सा. परिषदेच्या संशोधन विभागाचे प्रमुख म्हणून काम पाहतात. परिषदेच्या परीक्षा लोकप्रिय करण्याच्या कामी व शुद्धलेखनाच्या कामी डॉ. गोखले यांनी खूपच परिश्रम घेतले आहेत.

त्यांच्या या गौरवाबद्दल आम्ही त्यांचे अभिनंदन करितो.

## डॉ. य. खु. देशपांडे

विदर्भातील संशोधन-तपस्वी **डॉ. य. खु. देशपांडे** यांचा ८१ वा वर्धापन दिन जुलै २१, १९६३ रोजी यवतमाळ येथे साजरा झाला. इतिहास–संशोधन, आणि विशेषतः महानुभावी वाङ्मयाचे संशोधन, या क्षेत्रात त्यांनी केलेल्या प्रचंड कार्यामुळे त्यांना आंतरराष्ट्रीय मान्यता लाभलेली आहे. त्यांनी 'शारदाश्रम' या नावाची साहित्य व इतिहास यांतील संशोधनासाठी स्थापन केलेली संस्था आज तेथील पोथ्यांच्या संग्रहामुळे विख्यात झालेली आहे. तसेच या संस्थेजवळ असलेला हस्तलिखिते, चित्रे, कागदपत्र, नाणी व शिलालेखांचे ठसे यांचा संग्रहही फार मोठा आहे. डॉ. देशपांडे यांच्या संशोधनाचा व्याप, दीर्घोद्योग आणि विद्वत्ता यांच्याकडे पाहून कोणाचेही मस्तक कृतज्ञतेने आणि नम्र भावाने खाली वाकेल. त्यांच्या संकल्पित कार्याला पूर्णतेस नेण्यासाठी त्यांना दीर्घायुष्य व आरोग्य लाभो अशी प्रार्थना आम्ही करतो.

## 'आलोचना' व 'इंद्रायणी'

मराठीत नवी मासिके ध्येयवादाने प्रेरित होऊन निघतात, पण ती थोड्या कालावधीने थांबवावी लागतात; असा दुःखद इतिहास 'अभिरुची', 'छंद' इत्यादी मासिकांबाबत झालेला सर्वांच्या डोळ्यांपुढे आहे. असे असूनही **'आलोचना'**सारखी समीक्षाशास्त्रीय मासिके आज प्रयत्नपूर्वक आपले कार्य करीत आहेत ही कौतुकाची व अभिमानाची गोष्ट मानली पाहिजे. समीक्षक साहित्यात अशा मासिकांची एक परंपरा आहे व ती समीक्षेचा दर्जा वाढविण्यास उपयुक्त ठरतील यात शंका नाही. अशा तऱ्हेच्या मासिकांपेक्षा एक वेगळ्या तऱ्हेचे, पण ध्येयवादानेच प्रेरित झालेले मासिक म्हणजे **'इंद्रायणी'** नोव्हेंबर १९६२ पासून हे मासिक सुरू झाले व त्यातील लेखांचा संशोधनशास्त्रीय दर्जा पाहता ह्या मासिकाकडून वाचकांच्या अपेक्षा उंचावल्या जात आहेत असे मोठ्या अभिमानाने म्हणावे लागते. मराठी साहित्य, संस्कृती व शिक्षण यांना वाहिलेले हे मासिक मराठी संतवाङ्मय व संतसंप्रदाय यांच्याबद्दलच्या संशोधनाकडे जास्त झुकलेले आहे. कारण मासिकाचे संपादक श्री. **रा. चिं. ढेरे** हे या क्षेत्रातच रमलेले आहेत. मासिकाच्या प्रकाशनाची व्यवस्था 'हरिवरदा' या ग्रंथराजाचे अनुभवी व ध्येयप्रवण प्रकाशक श्री. **द. र. कोपर्डेकर** यांच्याकडे आहे व त्यामुळे या मासिकाचे कार्य अव्याहतपणे असेच चालू शकेल असा विश्वास वाटतो. या उपक्रमशील मासिकांचे मराठी वाचकांकडून वाढते स्वागत होत राहील अशी अपेक्षा आम्ही व्यक्त करतो.

## 'स्वामी'चे सुयश

परिषदेच्यावतीने हरिभाऊ आपटे यांच्या स्मृतीनिमित्त मराठीतील उत्कृष्ट ठरणाऱ्या कादंबरीस एक पारितोषिक देण्याचा उपक्रम सुरू झाला आहे. पहिले पारितोषिक श्री. रणजित देसाई यांच्या सुप्रसिद्ध 'स्वामी' या कादंबरीस देण्यात आले आहे. हरिभाऊंच्या स्मृतीनिमित्त असे पारितोषिक देण्यासाठी एक निधी परिषदेकडे सुपूर्त करण्यात आला होता; व त्याच्या व्याजातून हे पारितोषिक देण्यात येणार आहे. पारितोषिकाची रक्कम रु. ५१ इतकी थोडी म्हणजे नुसती संकेतरूपच आहे खरी, परंतु परिषदेच्यावतीने मिळणारे म्हणून हे एक मानचिन्ह समजले जाईल. या मानाचा लाभ 'स्वामी' या कादंबरीस मिळाला याबद्दल आम्ही श्री. **रणजित देसाई** यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो.

## चार थोर ऋषींच्या जन्मशताब्दी

सन १९६४ च्या मार्चपासून ऑगस्टपर्यंत मराठी साहित्य व संशोधन या क्षेत्रांतील चार मोठ्या ऋषींच्या जन्मशताब्दी येत आहेत, हा योगायोग मोठा लक्षात घेण्यासारखा आहे. हरिभाऊ आपटे यांची मार्च ३ रोजी, शिवरामपंत परांजपे यांची जून २७ रोजी, इतिहासाचार्य राजवाडे यांची जुलै १२ रोजी आणि अण्णासाहेब विजापूरकर यांची ऑगस्ट २६ रोजी -- अशा या चार शताब्दी आहेत. या चार जणांचे कार्य किती भिन्नभिन्न क्षेत्रांतील आहे! तरी त्यांच्या तपश्चर्येचा प्रभाव मात्र आपल्या सांस्कृतिक जीवनावर एकत्रित व एकजीव झालेला आढळतो. शंभर वर्षांपूर्वी यांचे जन्म झाले, त्या वेळी महाराष्ट्र व भारतही एका तमोयुगात असल्यासारखा चाचपडत होता. नवे संस्कार, आकांक्षा व मूल्ये क्षितिजावर अंधुकपणे दिसत होती. अशा वेळी आपटे यांनी मराठी साहित्याची नवी वाट उजळली; राजवाडे यांनी इतिहासाची नवी दृष्टी महाराष्ट्राला दिली; तसेच, नव्या विजिगीषु राष्ट्रवादाची भावना शिवरामपंतांनी चेतविली आणि विजापूरकर यांनी राष्ट्रीयत्वाच्या भावनेने उज्ज्वल झालेल्या शिक्षणाचा पाया घातला. गेल्या शंभर वर्षांत, आपल्या देशात आणि एकंदर मानवजातीच्या जीवनातच, घडून आलेली अनेक परिवर्तने पाहता या चार ऋषींच्या द्रष्टेपणाची कल्पना येऊन आपण नतमस्तक होतो. एक स्वतंत्र आणि स्वाभिमानी राष्ट्र म्हणून भारत नांदत आहे या सत्याचे दर्शन आज अनुभवीत असताना असे मनात येते की, आपटे प्रभृती या लोकनायकांच्या पुढे स्वतंत्र भारताचे दृश्य केवळ अंधुक, आकांक्षारूप व दूरवरचे असे होते; आणि त्यावरच अढळ विश्वास ठेवून त्यांनी आपापल्या क्षेत्रांत आमरण कार्य केले.

या थोर ऋषींच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने मराठीच्या सर्व नगरींतून पुढील वर्षी कार्य व्हावे व आपल्या सांस्कृतिक जीवनाच्या या आद्य शिल्पकारांना आदरांजली अर्पण व्हावी. या कामी आज मोठ्या व लहान शहरांतून असलेली महाविद्यालये, ग्रंथालये व साहित्यप्रेमी संघटना पुढाकार घेतीलच अशी अपेक्षा आम्ही करतो.

---

## शोकसमाचार

श्री. शां. वि. आवळसकर यांना कॅन्सरच्या आजाराने ऑगस्ट १३, १९६३ रोजी मृत्यू आला. इतक्या चोरपावलांनी ह्या रोगाने आक्रमण केले व इतक्या वेगाने त्यांच्या शक्तींचे हरण केले की, त्यांच्या मित्रांना त्यांचा आजार कळला व अल्पावधीत त्यांच्या मृत्यूची दुःखद वार्ता ऐकावी लागली. इतिहास -- संशोधनाचे वेड आणि साहित्यिक दृष्टी यांचा मोठा मनोज्ञ संगम त्यांच्यात होता. इतिहासातल्या व्यक्तींशी ते समरस होत व त्या काळात शिरण्यासाठी इतिहास-साधनांचा उपयोग करीत. बरीच मोठी संशोधनाची योजना व कार्य त्यांच्यापुढे आखलेले होते व त्यातच, मध्येच जागा करून बसविलेली एक कादंबरी लिहिण्याची ईर्षा, त्यांच्या मनात सारखी नांदत होती. एकसारखे मनसुबे करीत ते नित्याचे काम मात्र नेकीने व गढून जाऊन चालू ठेवीत. अशातच रोगाने अचानक घाला घातला. कार्यमग्न माणसाला असे मरण का यावे ! का फार मनसुबे रचलेले दैवाला खपत नाहीत ! असे काहीतरी विचार त्यांच्या मृत्यूने हादरलेल्या मनात येतात. पण मरणापुढे मानवी विचारांना खरा काही अर्थच उरत नाही. त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखात आम्ही सहभागी आहोत.

---

# प त्र व्य व हा र

संदर्भ : 'म. सा. पत्रिका' (जुलै १९६२) मधील 'आजची मराठी कविता' (द. भि. कुलकर्णी) या लेखातील ११ व्या पानावरचा पहिल्या स्तंभातील मजकूर— "वास्तविक कवितेत भाषेला वेगळे स्थान नसते हे पुनः सांगायला नको. शुद्ध मराठी आणि संस्कृतनिष्ठ मराठी, ग्रांथिक भाषा व व्यावहारिक भाषा हे भाषेचे वर्गीकरण पूर्णपणे अप्रस्तुत आहे. कवीच्या दृष्टीने भाषा हे निव्वळ द्रव्य असते. या द्रव्यातील शब्दघटकांची आपल्या अनुभवाशी एकरूप अशी पुनर्घटना कवी साधीत असतो."

श्री. कुळकर्ण्यांच्या या विचारातील शेवटच्या दोन वाक्यांतच विसंगती सापडते. हे अभ्यासू मनाला चटकन कळून येईल. त्यांच्याच वाक्यांतील काही शब्द घेऊन असे म्हणता येईल की भाषा या द्रव्यातील शब्दघटकांची आपल्या अनुभवांशी एकरूप अशी पुनर्घटना कवी साधीत असतो. आणि म्हणूनच कवीच्या दृष्टीने भाषा हे निव्वळ द्रव्य नसते (तो त्याच्या अनुभवांचा एक घटक होऊन बसतो.)

कारणे थोडक्यात सांगतो : (१) वाङ्मयीन कलाकृतीत आपण आपली सौंदर्यभावना भाषा ह्या साधनाच्या आधारे व्यक्त करीत असतो.

(२) साधनाच्या स्वरूपामुळे साध्यावर मर्यादा पडत असतात ही गोष्ट सर्वमान्य आहे.

(३) असे असले तरी जास्तीत जास्त साध्य त्याच साधनांच्या फेरफारातून कसे साधता येईल ह्या दृष्टीने कलावंताची धडपड असते. म्हणून प्रत्येक साहित्यिकाची भाषा त्याच्या कल्पनेनुसार वळणे घेत असते (वेगळी वाटत असते). रंगांत रंग मिसळून चित्रकार निरनिराळे रंग बनवीत असतो याचे कारण तेच आहे.

(४) काही कलाकृतींची साधने निसर्गदत्त असतात. त्यामुळे ती जगावर एकाच स्वरूपात आढळून येतात. म्हणून ती साधने देश-संस्कृतिनिरपेक्ष राहतात रंग सर्वत्र सारखेच. त्यापुढे जगातील निरनिराळ्या देशांतील चित्रकलेत रंगाची साधनसामुग्री तीच आहे.).

(५) पण (एक) भाषा हे वाङ्मयीन कलाकृतीचे साधन सर्वत्र सारखेच नाही. ते देश-प्रदेशसापेक्ष आहे. निरनिराळ्या देशांत निरनिराळी भाषा दिसून येते.

(६) तिच्या ह्या स्वरूपामुळे ती त्याच्या संस्कृतीचा एक घटक होऊन बसते. त्या संस्कृतीपासून ती वेगळी करता येत नाही (वाङ्मयीन कलाकृतीच्या संदर्भातच हे सत्य मानावे.). त्या विशिष्ट संस्कृतीशी, तेथील विशिष्ट परिस्थितीशी ती निगडित असते हे भाषा ह्या साधनाचे वैशिष्ट्य आहे.

(७) भाषा ही तेथील परिस्थितीशी, संस्कृतीशी व रोजच्या जीवनाशी निगडित असल्याने आणि वाङ्मयीन कलाकृतीतून त्या त्या जीवनातील सौंदर्यानुभव कलावंत व्यक्त करीत असल्याने त्याच्या भाषेला तेथील संस्कृतीच्या, परिस्थितीच्या व तेथील त्या त्या जीवनाच्या काही विशिष्ट छटा चिकटत असतात.

(८) याच मूलभूत कारणामुळे एका भाषेतील वाङ्मयीन कलाकृती दुसऱ्या भाषेत पूर्णपणे भाषांतरित होऊ शकत नाही. ही वाङ्मयीन कलाकृतीची मर्यादा किंवा तिचे वैशिष्ट्य आहे. म्हणूनच कलांच्या इतर साधनीभूत द्रव्याप्रमाणे भाषा निव्वळ द्रव्य होऊ शकत नाही.

(९) पण ज्या गोष्टी मूलभूत मानवी जीवनात सर्वत्र आढळून येणाऱ्या असतात आणि केवळ त्यांच्याच अनुभूतींचा आविष्कार अभिप्रेत असतो (किंवा साध्य असतो) त्या संस्कृति-देशनिरपेक्ष असल्याने भाषांतरित होऊ शकतील (म्हणूनच कित्येक भाषांतरे यशस्वी होतात, तर बरीच भाषांतरे महत्त्वाचा भाग आणू शकतात. पण चैतन्यदर्शक बारीक-सारीक छटा आणू शकत नाहीत. पाने खुडलेल्या झाडासारखी ही भाषांतरे असतात.).

(१०) हेच माझ्या कवितेच्या बाबतीत (श्री. कुलकर्णी यांनी तिच्या भाषेच्या बाबतीत आक्षेप घेतल्यामुळे) सांगता येईल. माझी ग्रामीण कविता ही ज्या जीवनातून, ज्या संस्कृतीतून, व ज्या प्रदेशातून जन्माला आली आहे तेथील भाषेतच जास्तीत जास्त साध्य गाठू शकेल; व ते त्या पद्धतीनेच गाठणे तिला नैसर्गिक वाटते. तिला दुसऱ्या भाषेत (कुलकर्णी यांना अभिप्रेत असलेल्या) गुंडाळून ठेवणे कलम केल्यासारखे होईल. त्याचे उदाहरण जर हवे असेल तर 'सुगी' (ग. ल. ठोकळ संपादित) काव्य-संग्रह पहावा.

(कुलकर्णी यांना आणखी एक नम्र सूचना करावी असे वाटते : भाषा हे शास्त्राला निव्वळ द्रव्य वाटत असते. कलाकृतीला नव्हे.)

— आनंद यादव

अनुक्रमणिका

# प्रा. रा. श्री. जोग : वाङ्मयदर्शन

द. न. गोखले

विपुलता किंवा विविधता हे काही प्रा. जोगांच्या वाङ्मयाचे खास विशेष नव्हेत. कारण जोगांनी आतापर्यंत मोजकेच लिहिले आणि जे लिहिले तेही तीनचार वाङ्मयप्रकारांत समाविष्ट होईल असेच लिहिले. ' ज्योत्स्नागीत ' व ' निशागीत ' हे छोटे काव्यसंग्रह; ' अभिनव काव्यप्रकाश ' व ' सौंदर्यशोध आणि आनंद-बोध ' हे साहित्य नि सौंदर्य यांची चर्चा करणारे शास्त्रीय ग्रंथ; ह्या ग्रंथांची पुरवणी म्हणता येईल असे ' काव्य-विभ्रम ' हे वृत्तालंकारांची माहिती देणारे पुस्तक; ' संस्कृत काव्यवाङ्मय ' ' अर्वाचीन मराठी काव्य ' ' केशवसुत : काव्यदर्शन ' व ' मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमाव-लोकन ' हे साहित्य समालोचनात्मक ग्रंथ; आणि ' चर्वणा ' ' विचक्षणा ' या संग्रहांत ग्रथित झालेले किंवा अन्यत्र विखुरलेले स्फुट लेख–एवढाच जोगांच्या वाङ्मयाचा विस्तार आहे. पण विपुलता किंवा विविधता हे जोगांच्या वाङ्मयाचे खास विशेष नसले तरी त्या विशेषांहून अधिक महत्त्वाचे असे कसदारपणा नि भरीवपणा हे त्याचे खास विशेष खचितच आहेत. आपापल्या प्रकारांत हे वाङ्मय पहिल्या श्रेणीत जाऊन बसले आहे आणि त्याने मराठीचे रत्नभांडार समृद्ध बनवले आहे.

**" करित काव्यगायन पहिले–"**

वाङ्मयाच्या रंगभूमीवर कवी म्हणून जोगांनी प्रवेश केला आणि पहिल्या प्रवेशालाच वेचक जाणकारांकडून टाळ्या घेतल्या. १९२६ व १९२८ साली ' निशिगंध ' या नावाने प्रसिद्ध झालेले ' ज्योत्स्नागीत ' व ' निशागीत ' हे त्यांचे छोटे काव्यसंग्रह तत्कालीन तरुणांत आणि काव्यरसिकांत बरेच मान्यता पावले होते. त्या संग्रहांत महाविद्यालयीन तरुणांच्या प्रेमभावनेची यथार्थ चित्रे अनलंकृत शैलीने रंगविली आहेत आणि त्या चित्रांच्या मुळाशी साक्षात अनुभव असावा असे राहून राहून वाटण्याइतकी ती प्रत्ययकारी उतरली आहेत. जोगांनी विशेष गेय नसणाऱ्या दोह्यासारख्या पद्यात ही काव्ये लिहिली आणि त्यांत व्यंजनेचा किंवा अलंकरणाचा उपयोगही फारसा केला नाही. पण या काव्यांत प्रतिपदी काही नाट्य जाणवते, सर्व काव्यांवर नाट्यगीतांची झळाळी झळकत राहते, आणि त्या नाट्या-मुळे शैली कोठेही अनाकर्षक किंवा थिटी वाटत नाही. प्रेमभावना हा या काव्यांचा विषय आहे. पण त्यांत विशुद्ध प्रेमभावनेखेरीज शृंगाराला कोठेही अवसर मिळालेला नाही. सात्त्विक नि उत्कट प्रणयभावना त्यांत सरळपणे सर्वत्र व्यक्त होते आणि ती भावनाच रसिकांच्या मनाला एखाद्या कुलीने-प्रमाणे मोह घालते. शिवाय, काव्य वाचीत असता कवीच्या तरुण पण प्रगल्भ, स्पष्ट पण ऋजू आणि मर्मग्राही पण संयमी अशा व्यक्तिमत्त्वाचा जो परोक्ष परिचय होतो तोही मोठा हवाहवासा वाटतो. ' अर्वाचीन मराठी काव्या 'च्या पहिल्या आवृत्तीत आपल्या या काव्यसंग्रहाबद्दल जोगांनी म्हटले की, ' काव्येतिहासामध्ये उल्लेख करण्यापलीकडे त्यांना महत्त्व, उरलेले नाही ! "–आणि दुसऱ्या आवृत्तीत तर या काव्य-संग्रहांसंबंधी सर्व उल्लेख गाळून त्यांनी असे सूचित केले की काव्येतिहासात उल्लेख करण्याइतकेही त्यांचे महत्त्व नाही ! पण आपल्या आत्मसंकोची स्वभावाला अनुसरून जोगांनी जरी या काव्यसंग्रहांना क्षुल्लक लेखले असले तरी काव्य-रसिकांना ते मुळीच मान्य होण्यासारखे नाही. त्यांचे हे काव्यसंग्रह त्यांच्या अंदाजाप्रमाणे " विस्मृतीच्या प्रांतात जमा " झालेले नसून थोड्या रसिकांच्या का होईना पण स्मृतीमध्ये अजून ताजे आहेत. या काव्यसंग्रहांप्रमाणेच " अजुन आठवे मजला ती स्पष्टपणे वेळ । करित काव्य-गायन पहिले होत अखेरील ॥ " ही त्यांची मिष्कील नि विनोदी कविताही अजून अनेकांना स्पष्टपणे आठवते. जोगांनी काव्यलेखनाला असा फार चांगला प्रारंभ केला आणि ' कमळाचे जाळे ' व ' उषागीत ' ह्या त्यांच्या आगामी काव्यसंग्रहांची जाहिरातही फडकली. पण ज्योत्स्नागीत ' नि ' निशागीत ' गाऊन त्यांचे ' पहिले काव्यगायन ' जे थांबले ते पुन्हा सुरू झाले नाही. तेच ' अखेरील ' ठरले ! त्यांनी कवीची भूमिका कायमची सोडून दिली आणि गंभीर शास्त्रीय लेखनाच्या प्रदेशात शिरून तेथेच ते रममाण झाले.

जोगांनी कवीची भूमिका अवचीत टाकून देण्याचा हा प्रकार प्रथम दर्शनी विस्मयकारक वाटतो; पण त्यामागील कारणपरंपरा हुडकून काढणे अवघड नाही. त्यांनी थोडे पण चांगले काव्य लिहिले आणि रसिकांच्या अपेक्षा

वाढवल्या हे खरे; पण त्यांचा पिंड कवीचा असण्यापेक्षा शास्त्रकाराचा होता. त्यांना काही उत्कट अनुभव आले, काव्यलेखनाचा तारुण्यसुलभ उत्साह त्यांच्यापाशी होता आणि पद्यरचनेसाठी आवश्यक ते भाषाप्रभुत्व त्यांना अवगत होते, म्हणून पहिली काव्ये त्यांच्या हातून होऊन गेली. पण त्या काव्यांच्या मुळाशी 'नवनवोन्मेषशाली प्रज्ञा' किंवा 'अभिनववस्तुनिर्माणक्षम प्रतिभा' होती, असे दिसत नाही. जे सौंदर्य आपण होऊन त्यांच्या अनुभवकक्षेत आले त्याचे त्यांनी रसिकतेने वर्णन केले, पण नवे नवे सौंदर्य धुंडीत त्रिखंड हिंडावे, सौंदर्याची निर्मिती करावी हा त्यांचा स्वभाव नव्हता. सौंदर्याच्या संश्लेषणापेक्षा सत्याचे विश्लेषण त्यांना प्रिय होते. आपल्या प्राध्यापनाच्या व्यवसायाशी काव्यनिर्मिती सुसंगत होईल असेही त्यांना वाटले नसावे. तेव्हा, 'प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति' असे घडले आणि त्यांनी कवीची भूमिका सोडून शास्त्रकाराची व समालोचकाची भूमिका स्वीकारली. आपला प्रकृतिगुण ओळखून त्यांनी भूमिका पालटली, हे त्यांना स्वतःला समाधानाचे वाटले असेलच; पण मराठी साहित्यशास्त्रात व साहित्यसमालोचनात त्यांनी जी मोलाची भर घातली तीमुळे मराठी वाङ्मयालाही ते लाभकारक ठरले.

## 'अभिनव काव्यप्रकाश'

१९३० साली प्रसिद्ध झालेल्या 'अभिनव काव्यप्रकाश' या ग्रंथात जोगांनी संस्कृत काव्यशास्त्र मराठीत आणण्याचा पहिला मोठा नि व्यापक असा प्रयत्न केला. तोपर्यंत संस्कृत काव्यशास्त्राच्या आधारे मराठीमध्ये १०–१२ ग्रंथ झालेले होते. पण संस्कृत काव्यशास्त्र विवेचक-बुद्धीने आणि समावेशक रीतीने मराठीमध्ये आणण्याचे काम त्या ग्रंथांकडून पार पडले नव्हते. काव्याच्या बऱ्याच अंगांची चर्चा गणेशशास्त्री लेल्यांच्या साहित्यशास्त्रामध्ये झाली होती पण ती फार त्रोटक होती, तिला फक्त २-३ संस्कृत ग्रंथांचाच आधार होता आणि काव्याची रीती, गुण, हेतू, प्रयोजन, विषय, भेद इत्यादी अंगे तीमध्ये अगदीच दुर्लक्षित राहिली होती. काव्यदोषांची सविस्तर चर्चा गणेश मोरेश्वर गोरे यांनी केली होती, पण ती एकाच काव्यांगापुरती होती आणि बहुतेक विस्मृत झाली होती. राजारामशास्त्री भागवतांनी आपल्या 'अलंकार-मीमांसे'त काही स्वतंत्र मते नि मार्मिक चर्चा सादर केली होती, पण राजारामशास्त्र्यांचा अपवाद वगळता रससंख्येत फेरबदल सुचविण्यापलीकडे स्वतंत्रतेची मजल कोणीही फारशी मारली नव्हती. "बहुतेक ग्रंथांची लेखनपद्धती चर्चात्मक (expository) नसून कोशस्वरूप (informative) होती. तेव्हा भरतापासून जगन्नाथापर्यंत वीसएक संस्कृत साहित्यशास्त्रकारांचा परामर्श घेत घेत काव्याच्या साऱ्या अंगांचा विचार जोगांनी स्वतंत्र बुद्धीने केला आणि काव्यशास्त्रावरील एक परिपूर्ण ग्रंथ मराठीला उपलब्ध करून दिला.

'अभिनव काव्यप्रकाश'च्या पहिल्या आवृत्तीत काव्यलक्षण, काव्याचे प्रयोजन, काव्यहेतू, काव्याचे विषय व काव्यदृष्टी, अर्थविचार किंवा शब्दशक्ती, रस, रीतिविचार, गुणविचार, काव्यदोष, अलंकारविचार, काव्यभेद, आणि काव्यशास्त्राचा इतिहास अशी प्रकरणे आली आहेत; तर पुढील आवृत्तीत काव्यशास्त्राचा इतिहास गाळून काव्यानंद-मीमांसा, काव्य आणि पद्य ही नवी प्रकरणे नि काही नवे विवेचन यांची भर घातली आहे.। मूळ उद्दिष्टाप्रमाणे संस्कृत काव्यशास्त्रामधील सारभूत विचार मराठीत आणण्यामध्ये या ग्रंथात जोग यशस्वी झाले आहेत असेच कोणाही निःपक्षपाती टीकाकाराला मान्य करावे लागेल. संस्कृत काव्य-शास्त्राचा त्यांचा व्यासंग गाढ आणि व्यापक होता आणि देवाने त्यांना साक्षेपी नि विवेचक बुद्धिमत्ता दिलेली होती. त्यामुळे प्रत्येक काव्यांगावरची सगळ्या संस्कृत पूर्वसूरींची मते त्यांनी एकत्र आणली, त्या मतांची तुलना केली आणि त्यांतील ग्राह्यांश तेवढा नेमका टिपून घेतला. त्यांच्या या पद्धतीमुळे संस्कृतातील गाळींव काव्यविचार मराठीत आला एवढेच नव्हे, तर त्या विचाराच्या भक्कम पायावर मराठी-तील काव्यशास्त्राची इमारत उभी राहणेही शक्य झाले. संस्कृत काव्यशास्त्र या प्रकारे मराठीत उतरवण्याचे जे कार्य जोगांनी केले त्याला मराठी वाङ्मयाच्या इतिहासात विशेष महत्त्व आहे. तेराव्या शतकात आणि नंतर महाराष्ट्रीय संतांनी संस्कृतातील अध्यात्मज्ञान मराठीत आणून मराठी भाषेवर व समाजावर मोठे उपकार केले. आंग्लाईत तसेच उपकार साहित्याच्या लहानशा क्षेत्रात संस्कृत साहित्यशास्त्र मराठीत आणून म. म. पां. वा. काणे, गोदावरी केतकर, प्रा. द. के. केळकर, प्रा. य. र. आगाशे, डॉ. के. ना. वाटवे, आणि प्रा. जोग इत्यादी मंडळींनी केले, असे म्हणावे लागेल. या मंडळींत प्रा. जोगांचा प्रयत्न अगदी प्रारंभकालातला, समग्र संस्कृत काव्यशास्त्र मराठीत आणणारा नि शिवाय विवेचनात्मक होता. त्यामुळे, इतरांच्या प्रयत्नांपेक्षा त्याचे महत्त्व साहजिकपणेच आगळे किंवा अधिक ठरावे, हे क्रमप्राप्त होय.

संस्कृत काव्यशास्त्र मराठीत आणताना प्रा. जोगांनी

अनुक्रमणिका

विवेचनात्मक पद्धती स्वीकारल्यामुळे संस्कृताचा अंध अनुवाद त्यांच्या हातून कोठेही झाला नाही. 'रसात्मकं वाक्यम्' ही काव्याची परंपरागत व्याख्या त्यांनी उचलून धरली, पण रसांची संख्या, रसांमधील गौणप्राधान्य, नवे रस वाङ्मयात येण्याची शक्यता इत्यादी विषयांवर पूर्वाचार्यांचा बांधीव आग्रह दूर सारला. काव्यानंदाचे रूढिसंमत अलौकिकत्व त्यांनी अमान्य केले. त्याला 'ब्रह्मास्वादसहोदर' म्हणण्याची प्रथा सकारण धुडकावून दिली आणि तो संमिश्र असतो हे सोदाहरण सिद्ध केले. संस्कृत काव्यशास्त्रकारांनी अलंकारांना जे अतिरिक्त महत्त्व दिले होते त्यातील दोष त्यांनी दाखवून दिला आणि अलंकारांना 'काव्यविभ्रम' ही संज्ञा देऊन त्यांचे काव्यातील नेमके स्थान स्पष्ट केले. करुणरसाची मीमांसा किंवा काव्यप्रकार हे विषय तर संस्कृतापेक्षा आधुनिक विचारांच्या बळावरच त्यांनी सजविले आहेत. त्यांनी संस्कृताची चाकोरी अशी जागोजाग सोडून दिली यातच त्यांचे वैशिष्ट्य आहे आणि त्यांच्या 'अभिनव काव्यप्रकाशा' चे अभिनवत्व आहे. संस्कृतातील विचाराला त्यांनी आधुनिक नि पाश्चात्त्य विचारांची जोड दिली आणि तो विचार पुढे नेला. काव्यलक्षणावर व्याख्यान करताना भामह, वामन, विश्वनाथ इत्यादी संस्कृत पंडितांची मते त्यांनी जशी तपासली तशीच शेली, कोलरीज, कार्लाईल जॉन्सन इत्यादी पाश्चात्त्य लेखकांची मतेही विचारात घेतली. काव्यानंदाची चर्चा करताना एकीकडे ते संस्कृतातील विचारांचा परामर्श घेतात, दुसरीकडे पाश्चात्त्य विद्वानांच्या उपपत्ती ध्यानात घेतात आणि तिसरीकडे प्रा. फडके डॉ. वाटवे, प्रा. कृ. पां. कुलकर्णी इत्यादी मराठी साहित्यशास्त्रज्ञांच्या मतांचाही मागोवा घेतात. विचारार्थ जो विषय हाती घेतला असेल त्यावर स्वतःला सुचलेला विचार एकदम 'अभिनव' किंवा 'क्रांतिकारक' म्हणून ठोकून देऊ नये, त्यासंबंधी पूर्वसूरींची मते काळजीपूर्वक बघावी, पूर्व विचारांतील ग्राह्याग्राह्य निवडावे, आणि मग समतोलपणे स्वतःचे मत सांगावे, असा त्यांच्या विवेचनशैलीचा स्वभाव आहे. त्यामुळे 'अभिनव काव्यप्रकाशा'त नवनव्या उपपत्तींचे जनक म्हणून ते आपल्या नजरेत भरत नाहीत; पण अनेक विचारांतील ग्राह्यांश निवडणारे नि त्या ग्राह्यांशांची सांगड घालणारे विधायक शास्त्रकार म्हणून आपल्या मनावर त्यांचा एक खोल ठसा उमटून राहतो.

संस्कृत काव्यशास्त्र मराठीत आणणाऱ्या लेखकांत जोगांचे स्थान जसे महत्त्वाचे आहे तसेच मराठीत स्वतंत्रपणे साहित्यविचार सांगणाऱ्या लेखकांतही ते महत्त्वाचे आहे. १९३० पूर्वी श्री. बा. अ. भिडे, तात्यासाहेब कोल्हटकर, नरसोपंत केळकर, वामनराव जोशी वगैरेंनी स्फुट ग्रंथपरीक्षणे किंवा साहित्यविषयक तात्त्विक लेख लिहिले होते; पण त्यांचे लेखन विकीर्ण नि प्रासंगिक होते. प्रा. व. दि. कुलकर्णी यांनी म्हटल्याप्रमाणे त्यातील "सिद्धान्त सखोल चिन्तनातून, व्यापक मनोबुद्धीतून आणि विशाल आत्मानुभवातून प्रकट झाले होते तरी त्यातून बसबर्शीतपणे एकसंध असे काव्यशास्त्र देणारा ग्रंथ हातांशी लागू शकला नाही." (सत्यकथा मे १९६२) जोगांनी संस्कृतातला विचार आणि पाश्चात्त्यांचा विचार यांच्या जोडीला आधुनिक मराठीतील विकीर्ण विचार एका सूत्रात गुंफला आणि मराठीला एकसंध काव्यशास्त्र दिले, हे त्यांचे वैशिष्ट्य होय. त्यांच्या 'अभिनव काव्यप्रकाशाच्या आतापर्यंत तीन आवृत्त्या निघाल्या आणि महाराष्ट्रातील विद्यापीठांतून गेली पंचवीसतीस वर्षे मराठीचे विद्यार्थी त्याचे अध्ययन करीत आहेत. हा ग्रंथ विद्यार्थ्यांपुढे असा सतत राहिला यात ग्रंथाच्या अंगभूत गुणांचा एक लौकिक गौरव तर आहेच; पण महाराष्ट्रातील काव्यशास्त्रीय विचारांची घडण या ग्रंथाने किती नि कशी होत आहे, याचेही ते चिन्ह आहे. मम्मटाचार्यांच्या 'काव्यप्रकाशा'-चा आदर्श पुढे ठेवून जोगांनी 'अभिनव काव्यप्रकाश' रचला आणि ते स्वतः जणू काही मराठीचे मम्मटाचार्य बनले

## 'काव्यविभ्रम'

'अभिनव काव्यप्रकाशा'त जोगांनी अलंकारांसंबंधी अशी भूमिका मांडली होती, की 'अलंकार हे वस्तुतः शरीरबाह्य अशा दागिन्यांप्रमाणे नसून शरीरगत विभ्रमांप्रमाणे अंगभूत असे असतात. १९५१ साली प्रकाशित झालेल्या 'काव्यविभ्रम' या पुस्तकात त्याच भूमिकेवरून मराठी कवितेत प्रामुख्याने आढळणाऱ्या अलंकारांचे सविस्तर विवेचन त्यांनी केले आणि पदवीपरीक्षांच्या विद्यार्थ्यांची व त्या प्रकारच्या जिज्ञासू अभ्यासकांची एक गरज भागविली. काव्यावर सुंदरीचे रूपक केले, की अलंकारांप्रमाणे वृत्तांनाही विभ्रम म्हणावे लागते. फरक इतकाच की अलंकार जर 'स्थितिविभ्रम' असतील तर वृत्ते 'गतिविभ्रम' होत. तेव्हा 'काव्यविभ्रमा'वरील या पुस्तकात अलंकारांप्रमाणे वृत्तांचाही परिचय "अगदी अप्रौढ नाही, किंवा विशेष प्रगतही नाही अशा अभ्यासकांना जोगांनी करून दिला. वास्तविक पाहता 'काव्यविभ्रमा'वरील पुस्तकात नवकाव्यातील प्रतिमांचा किंवा एकंदर ललित साहित्यातील शैलीचा विचार प्रस्तुत ठरला असता. पण परंपरामान्य शास्त्राचा विशिष्ट वाचकवर्गाला

परिचय करून द्यावा, ही मर्यादित भूमिका पतकरल्याने तसा विचार या पुस्तकात झालेला नाही.

### सौंदर्यशोध आणि आनंदबोध'

'काव्यविभ्रमा'पूर्वी, १९४३ साली प्रसिद्ध झालेल्या 'सौंदर्यशोध आणि आनंदबोध'या ग्रंथाचा उगमही 'अभिनव काव्यप्रकाशा'मध्येच झाला, असे म्हणता येईल. काव्यशास्त्राचा एक भाग म्हणून 'अभिनव काव्यप्रकाशा'मध्ये रसाचा व काव्यानंदाचा विचार आलेला होता. तो विचार अधिक व्यापक भूमिकेवरून'सौंदर्यशोध आणि आनंदबोध' या ग्रंथात केलेला आहे आणि काव्यानंदाचे अथवा कलानंदाचे कारण जे सौंदर्य त्याचाही अत्यंत विस्तृत ऊहापोह त्यात मांडलेला आहे. मात्र 'काव्यविभ्रम' व 'सौंदर्यशोध आणि आनंदबोध' या दोहींचे उगमस्थान एकच असले तरी दोहोंतील विचारांच्या पातळी अगदी भिन्न आहेत. पहिल्याची पातळी महाविद्यालयीन विद्यार्थ्यांची गरज भागविणाऱ्या चांगल्या पाठ्यपुस्तकाची आहे, तर दुसऱ्याची पातळी एक नवी विचारप्रणाली नि एक नवे शास्त्र मराठीत आणू पाहणाऱ्या युगप्रवर्तक ग्रंथाची आहे. 'अभिनव काव्यप्रकाशा'पेक्षाही वैचारिक क्षेत्रात 'सौंदर्यशोध आणि आनंदबोध' हा ग्रंथ अधिक महत्त्वाचा आहे, असे म्हणावे लागेल. 'अभिनव काव्यप्रकाशा'ने मराठीला काव्यशास्त्रावरील एक परिपूर्ण व चिकित्सक ग्रंथ प्रथमतः दिला, हे खरे; पण त्याची रूपरेषा किंवा मूलविचार ही फारशी नवीन नव्हती. संस्कृतात असे ग्रंथ आधी झालेले होते आणि त्यांचीच परंपरा डोळसपणे त्याने पुढे चालवली. पण 'सौंदर्यशोध आणि आनंदबोध' या ग्रंथाला संस्कृताचा तसा आधार नव्हता. सर्व ललित कलांना सामान्य असणाऱ्या सौंदर्याचे शास्त्र सांगावे, ही या ग्रंथाची भूमिका आहे आणि संस्कृतात तसे शास्त्र जन्मालाच आलेले नव्हते. फक्त काव्यशास्त्राच्या, म्हणजे साहित्यशास्त्राच्या अनुषंगानेच सौंदर्याचा व त्यापासून होणाऱ्या आनंदाचा अथवा रसाचा विचार संस्कृतात झाला होता. पाश्चात्त्यांमध्ये तत्त्वज्ञानाचा एक विभाग म्हणून त्या मानाने 'एस्थेटिक्स' बरेच प्रगत झालेले होते. तेव्हा, संस्कृतातला अल्प विचार आणि पाश्चात्त्य पंडितांचा काहीसा सविस्तर विचार ध्यानी घेऊन मराठीत सौंदर्यशास्त्र नव्याने रचू पाहणे, ही 'अभिनव काव्यप्रकाशा' च्या वरची पायरी होती, यात शंका नाही. 'अभिनव काव्यप्रकाशा' मध्ये जोगांनी संस्कृतातील मूल विचाराला पाश्चात्त्य नि आधुनिक विचारांची जोड दिली; तर 'सौंदर्यशोध आणि आनंदबोध' या ग्रंथामध्ये पाश्चात्त्य मूलविचाराला पौरस्त्य किंवा संस्कृतातील विचारांची जोड दिली. तेव्हा, दोन्ही ग्रंथांमध्ये ज्ञानवर्धनाची क्रिया एकाच प्रकारची झाली, असे म्हणता येईल. पण 'अभिनव काव्यप्रकाशा' पेक्षा 'सौंदर्यशोध आणि आनंदबोध' या ग्रंथात आधारभूत असलेला पूर्व विचार सापेक्षतः क्षीण होता आणि नवनिर्मिती त्या मानाने अधिक झाली, असे तौलनिक दृष्टीने बघितल्यास दिसून येते. अर्थात हा ग्रंथ विचारप्रगतीच्या मापाने जास्त महत्त्वाचा ठरावा, हे उचित होय.

या ग्रंथात, 'सौंदर्य वस्तुगत असते आणि त्याची अनुभूती व्यक्तिगत असते' अशी भूमिका घेऊन जोगांनी त्या भूमिकेचे उत्कृष्ट समर्थन केले आहे. पुढे 'सौंदर्य निर्मितीत एकच एक घटक असतो असे न मानता, अनेकविध घटकांनी सौंदर्यनिर्मिती होते असे ते मानतात आणि ग्रंथाचा 'सौंदर्यशोध' हा प्रथमार्ध ललित कलांमधील सौंदर्याचे घटक शोधून त्यांच्या स्वरूपनिश्चितीसाठी ते खर्ची टाकतात. सौंदर्याच्या घटकांचा शोध करीत असताना इंद्रियगम्य घटकांकडून बुद्धिगम्य घटकांकडे आणि तेथून भावनागम्य घटकांकडे अशी त्यांची गती आहे. सौंदर्य वस्तुगत असले तरी त्यांची अनुभूती व कसोटी शेवटी व्यक्तिगत असल्यामुळे, वस्तुगत सौंदर्याचे घटक सांगून झाल्यावर ते साहजिकपणे सौंदर्यामुळे व्यक्तीला जो आनंद होतो त्याकडे वळतात. सौंदर्याप्रमाणे हा आनंदही अनेकविध घटकांनी बनलेला असतो असे मानून, ग्रंथाचा 'आनंदबोध' हा द्वितीयार्ध त्या आनंदाच्या विश्लेषणात त्यांनी खर्च केला आहे. आनंदाचे सर्व प्रमुख घटक त्यांनी सांगितले आहेत आणि ते केव्हा नि कसे कार्यकारी होतात ते सोदाहरण स्पष्ट केले आहे. काव्यानंद किंवा सौंदर्यानंद अलौकिक नसतो, व्यवहारातील इतर आनंदाप्रमाणे तो लौकिकच असतो, असे त्यांचे प्रतिपादन आहे. शेवटी, सौंदर्यानंदातील 'करुणरसमीमांसा' या सर्वात जटिल नि गूढ प्रश्नाकडे ते वळतात आणि असा धीट निर्णय देतात, की करुणरसाचा अनुभव केवळ सुखमय नसतो, तो दुःखमिश्रित असतो, आणि जी सुखोत्पत्ती होते ती अनेक कारणांनी होते.

ग्रंथाच्या या त्रोटक रूपरेषेवरून जोगांच्या विचारप्रणालीची पुसट तोंडओळख होऊ शकेल; पण सौंदर्यविचाराच्या क्षेत्रात त्यांनी प्रगतीचा केवढा पल्ला गाठला त्याची स्पष्ट कल्पना येणार नाही. आपली विचार प्रणाली मांडीत असता अनेक मान्यवर विचारवंतांशी त्यांना दोन हात करावे लागले, त्यांच्या उपपत्तीमधील उणिवा निर्भयपणे दाखवाव्या

लागल्या, आणि नव्या सिद्धान्तांची प्रस्थापना करावी लागली. एकच वस्तू अनेकांना कमजास्त प्रमाणात सुंदर वाटते, स्थलकालानुसार सौंदर्यकल्पना बदललेल्या आढळतात, आणि क्वचित जे एकाला सुंदर दिसते ते दुसऱ्याला असुंदर दिसते. तेव्हा सौंदर्य वस्तूमध्ये नसून पाहणाऱ्यामध्ये आहे,( लैलाच्या शरीरात नसून मजनूच्या डोळ्यांत आहे! ) ते व्यक्तिगत आहे, अशी समजूत अनेक सौंदर्यमीमांसकांमध्ये वावरत असते. पण जोगांनी ' सौंदर्य ' आणि त्याची ' अनुभूती या दोन गोष्टी वेगळ्या केल्या आणि ' सौंदर्य वस्तुगत असते पण त्याची अनुभूती व्यक्तिगत असते ' हे प्रमेय सिद्ध केले. सौंदर्य वस्तुगत नसेल तर त्याचे वस्तुनिष्ठ किंवा ऑब्जेक्टिव्ह शास्त्र तयार होणे अशक्य आहे हे लक्षात घेतले, की ' सौंदर्य वस्तुगत आहे...' हे प्रमेय सिद्ध करून जोगांनी सौंदर्यशास्त्राचा पायाच पक्का केला हे स्पष्ट होते. त्यांनी सौंदर्याचे व तन्मूलक आनंदाचे अनेक घटक मानले, हा वैचारिक दृष्टीने त्यांचा आणखी पराक्रम म्हणावा लागेल. ' नानाविधतेतून एक सूत्र शोधणे म्हणजे शास्त्रशोध होय, तेव्हा सौंदर्याला किंवा तन्मूलक आनंदाला एकच एक कारण असले पाहिजे ' अशी समजूत कित्येक सौंदर्य-मीमांसकांनी करून घेतलेली आहे. पण या समजुतीला ते बळी पडले नाहीत. त्यांनी रसिकांना येणारा अनुभव प्रमाण मानला आणि सौंदर्याचे किंवा सौंदर्यानंदाचे काहीतरी एकमेव कारण पुढे करणाऱ्या अनेक उपपत्ती उण्या म्हणून टाकून दिल्या. हे करीत असताना क्षेमेंद्र किंवा अभिनवगुप्त, ॲरिस्टॉटल किंवा आय. ए. रिचर्ड्स, ना. सी. फडके किंवा न. चिं. केळकर यांसारख्या विख्यात व्यक्तींच्या उपपत्ती त्यांना तपासाव्या लागल्या; पण सौजन्य न सोडता एक तऱ्हेच्या बौद्धिक निष्ठेने त्यांनी ते काम काटेकोरपणे पार पाडले. 'सौंदर्यानंदाच्या प्रत्येक उपपत्तीला रसिकाच्या अनुभवाचा काही आधार असतो, म्हणूनच तीत काही सत्यांश असतो; पण ती उपपत्ती सौंदर्याच्या सर्व अंगांना जर लागू पडत नसेल तर उणी समजली पहिजे, अशी रास्त विचारसरणी त्यांनी स्वीकारली व सर्व उपपत्तींचे चोख परीक्षण केले. पूर्वसूरींची एखादी उपपत्ती उचलून न धरता किंवा सौंदर्यानंदाचे एकच विशिष्ट कारण देणारी स्वतःची नवी उपपत्ती पुढे न करता त्यांनी ' अनेकतावाद ' पत्करला, सौंदर्याचे व सौंदर्यानंदाचे अनेक घटक मानले,हा अनेक पूर्वाचार्यांपेक्षा त्यांनी चोखाळलेला मार्ग नवा आहे. या मार्गाने गेल्यामुळे ते सत्याच्या अधिक जवळ पोहोचले. असे निःपक्षपाती विचार केल्यास कोणालाही मान्य होऊ



शकेल. वैचारिक प्रगतीच्या दृष्टीने, ' करुणरसाचा अनुभव एकंदरीत सुखमय पण दुःखमिश्रितच असतो ' हे त्यांनी सप्रमाण सांगितले, हे महत्त्वाचे होय. करुणरसापासून होणारा आनंद निर्भेळ असतो. असे गृहीत धरून त्या निर्भेळ आनंदाची उपपत्ती देण्याचा खटाटोप आजवर वारंवार झाला आहे. पण या गृहीत कृत्यातील फसवेपणा त्यांनी नाट्यदर्पणकारांप्रमाणे पुन्हा एकदा उघड केला आणि करुण रसाची चर्चा मलतीकडे वहात होती तिला योग्य वळण लावले. यापुढे, करुणरसात रसिकाला दुःखानुभव येतो हे मान्य करून त्या दुःखानुभवावर आनंदाची कडी का होते त्याची कारणे व त्या कारणांमधील गौणप्राधान्य यांच्या शोधावर करुणरसाची चर्चा केंद्रित करणे प्राप्त आहे.

ग्रंथाची जी रूपरेषा आधी सांगितली तीमध्ये सूचित झालेले विचारप्रगतीचे काही टप्पे येथवर स्पष्ट करून झाले. पण ' सौंदर्यशोध आणि आनंदबोध ' या ग्रंथाचे वैचारिक मूल्य कळण्याच्या दृष्टीने त्यातील आणखी एक दोन विचार येथे सांगितले पाहिजेत. ' जीवनासाठी कला की कलेकरिता कला ' हा वाद एके काळी महाराष्ट्रात खूपच रंगला होता. त्या वादात जोग कधी बाह्या सरसावून उतरले नाहीत आणि कोणत्याच वादात ते कधी गाजले-गरजले नाहीत. पण एका व्यापक नि उच्च भूमिकेवरून त्या वादाचा फार चांगला निर्णय ' सौंदर्यशोध आणि आनंदबोध ' या ग्रंथात त्यांनी करून ठेवला आहे. " कलाकृती किंवा सौंदर्यनिर्मिती इतर व्यावहारिक कृती-इतकीच सामाजिक निर्बंधास पात्र असते " या भूमिकेचे प्रथम ते समर्थन करतात आणि मग प्रस्तुत वादाचा पुढीलप्रमाणे निर्णय करतातः— " कलेचे ध्येय सौंदर्य-दर्शन करून जीवन संपन्न करणे हे आहे. जीवन संपन्न करण्याकरिता सौंदर्यदर्शन करणे हे नाही. कलेवर बंधन घालावयाचे तर जीवनास ती विरोधी होता कामा नये एवढेच घालणे युक्त होईल....जीवनास आवश्यक अशा गोष्टींचा प्रचार करण्याकरताच कलाकृती निर्माण व्हावयास हव्यात किंवा अशाच कलाकृती श्रेष्ठ दर्जाच्या होत असा आग्रह धरता येणार नाही. " ..." कले-करिता कला " या घोषवाक्याचा अर्थ कोणत्याच प्रकारे बंधन कलेला नको आहे असा नसून, सौंदर्यविषयाखेरीज इतर विषयांचा प्रचार-पुरस्कार करण्याचे काम तिच्यावर लादले जाऊ नये असा आहे. त्याचप्रमाणे ' जीवना-करिता कला ' याचा अर्थही जीवनानुकूल तत्त्वज्ञानास विरोधी असे काही कलेने सांगू नये एवढाच आहे.

असमकेच सांगितले पाहिजे असा नाही." ...' कला व जीवन यांचे संबंध लक्षात घेण्यात ऐकान्तिक वृत्ती असता कामा नये. ' (पृ. २९० ते २९३) –याप्रमाणे कला आणि जीवन यांचे सापेक्ष महत्त्व ओळखून जोगांनी ' जीवनासाठी कला की कलेकरिता कला ' हा वाद मिटवला आहे. पण याहीपुढे जाऊन, सौंदर्याला स्वतः-साठीच ' सत्य ' आणि ' शिव ' यांची काळजी घ्यावी लागते, हे त्यांनी केवळ-कलावाद्यांच्या निदर्शनास आणून दिले आहे आणि मोठीच कामगिरी बजाविली आहे. सौंदर्यापासून होणाऱ्या आनंदात इंद्रियगम्य आनंदापेक्षा बुद्धिगम्य आनंद आणि त्याहून भावनागम्य आनंद श्रेष्ठ होय, हा प्राचीनांचा सिद्धान्त ते उचलून धरतात आणि मग ' सत्यं, शिवं, सुंदरम् ' या त्रिपुटीतील संघर्ष कलाक्षेत्रात कसा भ्रामक आहे ते दाखवून देतात. ते म्हणतात, " या तीनही गोष्टींना त्यांची स्वतःची मूल्ये आहेत याचा अर्थ त्या तिहींपासून उच्च आनंद, क्षुद्र-स्वार्थनिरपेक्ष आनंद मिळणे शक्य असते असा आहे. अशा आनंदाची प्राप्ती करून देणारे जे जे असेल ते ते सुंदरच म्हणावयास हवे. मग ते वस्तुसौंदर्यासारखे बऱ्याच अंशी केवळ इंद्रियग्राह्य असो, सत्यसौंदर्यासारखे बऱ्याच अंशी बुद्धिग्राह्य असो, किंवा सद्गुण अथवा नीती यांसारखे बऱ्याच अंशी भावग्राह्य असो."... " दया, क्षमा, न्याय, प्रेम...इत्यादी नीतिघटक अशा अनेक गुणांच्या द्वारेच मनुष्याच्या आत्म्याच्या सौंदर्याचा आविष्कार होत असतो... हे आत्मिक सौंदर्य विशद करणे हेही कलावंताचे कर्तव्य आहे, आणि या सौंदर्यास सोडून असणाऱ्या विरूप व्यक्ती किंवा आत्मे आणि त्यांच्या कृती या कलाविषय न करणे, निदान त्यांना प्राधान्य न देता त्यांचा उपयोग करणे, हेही सौंदर्यैकदृष्टी ठेवणाऱ्या कलावंतांच्या दृष्टीने इष्ट ठरते." ..." कलांमध्ये म्हणजेच सौंदर्यदर्शनामध्ये सत्याचा किंवा नैतिक विचाराचा आग्रह हा सौंदर्याकरताच धरावयाचा आहे, ही भूमिका स्पष्ट झाल्यास सौंदर्याचा आणि नीतीचा संघर्ष होण्याचे कारणच उरत नाही." ..." तेव्हा खरी भूमिका अशी की, सौंदर्योपासकास वस्तुसौंदर्याच्या भौतिक घटकांविषयी जी आस्था वाटते, तीच आस्था बुद्धिग्राह्य अशा सत्य, नावीन्य, सूचकता, औचित्य अशा घटकांविषयी असावयास पाहिजे. त्याच-प्रमाणे न्याय, नीती, सद्गुण इत्यादी भावनासंबद्ध किंवा भावनाग्राह्य अशा घटकांविषयीही असावयास पाहिजे.... असे केले तरच खरे सौंदर्यसाधन होईल, नाहीतर सहृदयाच्या दृष्टीने त्याची कृती असुंदरच ठरेल." (पृ. १३३ ते १३६)–याप्रमाणे ' सत्य ', ' शिव ' किंवा ' नीती ' यांतील ' सौंदर्य ' जोगांनी पाहिले आणि सौंदर्यैकदृष्टीनेच कलेच्या क्षेत्रात त्यांचा पुरस्कार केला. यामध्ये, ' सत्यं, शिवं, सुंदरम् ' या त्रिपुटीबद्दलचा वाद किंवा ' कला आणि नीती ' याबद्दलचा वाद त्यांनी एका उंच पातळीवर नेला आणि तो समाधानकारक रीतीने सोडवला, हे सहज दिसण्यासारखे आहे.

' सौंदर्यशोध आणि आनंदबोध' या ग्रंथात जोगांच्या बुद्धिवैभवाचा उत्कर्ष पाहावयास सापडतो, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. पूर्वाचार्यांच्या उपपत्तीचे सूक्ष्म नि समतोल परीक्षण त्यात आहे, सौंदर्य नि सौंदर्यानंद यांच्या स्थूल किंवा चपल अंगांचे साक्षेपी दर्शन त्यात आहे, अनेकविध ठिकाणी आढळलेल्या सत्याचे सुसंगत संश्लेषण त्यात आहे, नव्या विचाराचे नि विचारप्रणालीचे उपपादन त्यात आहे आणि एका नव्या शास्त्राची मराठीतील आद्य प्रस्थापनाही त्यात आहे. या ग्रंथाला दक्षिण महाराष्ट्र-साहित्य-पुरस्कार समितीने पारितोषिक देऊन गौरविले, हे योग्यच झाले. पण त्याला डी. लिट्. ची पदवी किंवा साहित्य अकादमीचा पुरस्कार लाभला असता तरी तो गौरवही उचितच ठरला असता. जोगांनी डी. लिट्. साठी ग्रंथ सादर केला नाही, आणि ग्रंथ प्रकाशनाच्या वेळी साहित्य-अकादमी अस्तित्वातच नव्हती म्हणून तसा गौरव या ग्रंथाला मिळाला नाही हा केवळ योगायोग होय. नाहीतर, प्रा. माधवराव पटवर्धनांची ' छंदोरचना ' किंवा श्री. बा. सी. मर्ढेकरांचे ' सौंदर्य आणि साहित्य ' या ग्रंथांच्या कोटीतील हा ग्रंथ आहे, हे निःसंशय. हा ग्रंथ लिहून मराठीतील सौंदर्य-मीमांसेमध्ये जोगांनी मोलाची भर घातली आणि त्या मीमांसेची पातळी पुष्कळ उंच नेली, असाच निष्कर्ष कोणाही सुज्ञ समालोचकाला काढावा लागेल.

**' संस्कृत काव्यवाङ्मय '**

१९४५ साली लोकशिक्षण-लघुग्रंथमालेतर्फे प्रसिद्ध झालेले ' संस्कृत काव्यवाङ्मय ' हे पुस्तक संस्कृत काव्य-वाङ्मयाची तोंडओळख मराठी वाचकांना करून द्यावी, या मर्यादित उद्देशाने जोगांनी लिहिलेले आहे. कालिदास, भारवी, माघ, श्रीहर्ष, भर्तृहरी, जयदेव, जगन्नाथ, अमरू, बिल्हण, क्षेमेंद्र इत्यादी कवींचा स्थूल परिचय त्यात करून दिलेला असून 'उपसंहारा'त अभिजात संस्कृत काव्याची महत्त्वाची वैशिष्ट्येही थोडक्यात सांगितलेली आहेत.

'अभिनव काव्यप्रकाश'सारखे साहित्यशास्त्रीय ग्रंथ हा जसा जोगांच्या संस्कृताभ्यासाचा एक परिणाम तसाच हे पुस्तक म्हणजे दुसरा परिणाम म्हणता येईल. संस्कृत काव्यवाङ्मयाची तोंडओळख करून देणे हाच जरी या पुस्तकाचा मर्यादित हेतू होता तरी परिचयाच्या अनुषंगाने थोडे पण चांगल्या दर्जाचे मूल्यमापनही त्यात सहजासहजी समाविष्ट झाले आहे. जोगांच्या एकूण वाङ्मयनिर्मितीमध्ये या पुस्तकाचे स्थान 'काव्यविभ्रमा'प्रमाणे गौणच आहे. पण त्यातही त्यांच्या वृत्तीमधील साक्षेप, अभ्यासामधील भरीवपणा आणि मार्मिक रसिकता यांचा प्रत्यय आल्याशिवाय राहत नाही.

**' केशवसुत : काव्यदर्शन '**

'अर्वाचीन मराठी काव्य' आणि 'केशवसुतः काव्यदर्शन' या १९४६ व १९४७ साली प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांनी साहित्यसमालोचनाच्या क्षेत्रात जोगांनी खरेखुरे पदार्पण केले आणि अर्वाचीन मराठी काव्याचे अग्रगण्य समालोचक म्हणून आपली कीर्ती प्रस्थापित केली. या ग्रंथांपैकी केशवसुतांवरील ग्रंथ जरी 'अर्वाचीन मराठी काव्या' नंतर प्रसिद्ध झाला तरी तो आधी लिहिलेला आहे. एखाद्या कवीचा समावेशक, सुश्लिष्ट, सखोल, आणि समतोल अभ्यास कसा करावा याचा आदर्श म्हणून या ग्रंथाकडे विश्वासाने बोट दाखविता येईल. त्यात केशवसुतांचे चरित्र, त्यांचे काव्यशास्त्र, सामाजिक तत्त्वज्ञान, जीवनदृष्टी व गूढगुंजन, प्रेमकाव्य, निसर्गपूजा, वाङ्मयऋण, पद्यरचना, काव्यशैली इत्यादी विषयांचा साधार अभ्यास मांडला आहे आणि अनेक निष्कर्ष युक्तिवादपूर्वक काढले आहेत. कोणताही निष्कर्ष काढताना केशवसुतांच्या झाडून साऱ्या कविता आणि त्यांच्यासंबंधी प्रसिद्ध झालेले समग्र वाङ्मय जोगांनी दृष्टीसमोर ठेवले आहे आणि त्यामुळे त्यांचे निष्कर्ष अव्याप्ती किंवा अतिव्याप्ती या दोषांपासून अलिप्त राहण्यास मदत झाली आहे. त्यांचे निष्कर्ष सावध नि समतोल आहेत आणि ज्या कवीवर आपण ग्रंथलेखन करावयाचे त्याच्याबद्दल अभिनिवेश बाळगावयाचा या स्वाभाविक रोगापासून त्यांचे लेखन मुक्त आहे. त्यामुळे, त्यांचे लिहिणे काही लोकांना बोथट किंवा मिळमिळीत वाटेल आणि काही लोकांना त्यात विश्लेषण करकरून साखर सोलल्याचाही भास होईल. पण सत्याच्या समग्र दर्शनासाठी त्यांनी केलेला निकराचा प्रयत्न नि त्यात मिळविलेले मोठे यश यासंबंधी जाणकारांमध्ये मतभेद होण्याचा फारसा संभव नाही. एकाच बाजूबद्दल अभिनिवेश बाळगल्याने लेखनात जी दीप्ती येते ती जोगांच्या ग्रंथात नाही; पण त्याचा अर्थ आपले निष्कर्ष त्यांनी गुळमुळीत वृत्तीने काढले आहेत असा नाही. उलट, केशवसुतांचे भक्त आणि विरोधक या उभयतांना अप्रिय होतील असे अनेक निष्कर्ष सत्यशोधनाच्या तीव्र निष्ठेने त्यांनी काढले आहेत आणि ते कोणाचाही मुलाहिजा न ठेवता स्पष्टपणे मांडले आहेत. समग्र सत्याचा सौजन्यपूर्ण निष्ठेने केलेला शोध, असे या ग्रंथाचे थोडक्यात वर्णन करता येईल.

केशवसुतांच्या वेळी मराठी कवितेत क्रान्ती झाली किंवा नाही, आणि झाली असल्यास तिचे श्रेय केशवसुतांना कितपत देता येईल, हा केशवसुतासंबंधी वादाचा मुख्य मुद्दा होता. मराठी कवितेत क्रान्ती झालीच नाही, असे श्री. बा. अ. भिड्यांसारखे समालोचक म्हणत होते; तर क्रान्ती झाली असली तरी तिचे श्रेय केशवसुतांना देता येत नाही, असे प्रा. मा. त्र्यं. पटवर्धनासारखे समालोचक सांगत होते. या वादात, क्रान्ती म्हणजे काय, यासंबंधीही मतमतांतरे उत्पन्न झाली होती. पण वादातील सर्व बाजूंचा सारासार नि सांगोपांग विचार करून जोगांनी क्रान्ती झाली असा निष्कर्ष काढला आणि क्रान्तीचे मुख्य श्रेयही केशवसुतांच्या पदरात टाकले. केशवसुतांच्या पूर्वीची ' जुनी ' कविता आणि केशवसुतांच्या नंतरची ' नवीन ' कविता यांतील मुख्य भेद मार्मिकपणे दाखवून ते भेद क्रान्तिस्वरूपाचे होते असे त्यांनी प्रतिपादन केले. ते म्हणतात, " नवीन कवितेपैकी **बऱ्याच** कवितेचे स्वरूप स्फुट आणि भावगीतात्मक आहे. जुन्या कवितेपैकी **बरीच** कविता दीर्घ आणि कथनात्मक आहे. जुन्या कवितेमध्ये काव्याचे **मुख्य** वाहन संस्कृत वृत्ते व मराठी छंद असे होते. नवीन कवितेचे **मुख्य** वाहन मात्रावृत्ते अथवा जाती हे आहे. हे बाह्यांगासंबंधी झाले. अंतरंगासंबंधी अधिक महत्त्वाचे बदल झाले. जुन्या कवितेत धार्मिक व पौराणिक विषयांनाच **प्राधान्य** आहे. नवीन कवितेत लौकिक व सामाजिक विषयच **प्राधान्याने** येत आहेत. असे होण्याचे कारण म्हणजे काव्याकडे पाहण्याची भिन्न दृष्टी हे होय. काव्य हे भक्तीचे साधन आहे हीच जुन्या कवितेची **बव्हंशी** दृष्टी होती. भक्तीचे साधन म्हणून काव्याकडे पाहण्याची दृष्टी आज उरली नसून ' काव्याकरिता काव्य ' हीच दृष्टी **बहुतांशी** प्रभावी आहे. अर्थात त्याच्या द्वारे आत्माविष्कार करता येतो; आणि आत्माविष्काराचे साधन म्हणा किंवा आत्माविष्कारच म्हणा, म्हणून

आमचे काव्य फार मोठ्या प्रमाणात, आत्मलेखनात्मकच निर्माण होत आहे...नवीन कवितेमधील सार्‍या गोष्टी जुन्या कवितेत कुठे ना कुठे अल्प प्रमाणात होत्या असे क्षणभर मानूनही पूर्वीचा गौणप्रधानभाव अजिबात उलटला एवढी गोष्टही क्रान्तिस्वरूपाची म्हणून मान्य व्हावयास प्रत्यवाय नसावा, " (पृ. ३८-३९) पुढे, केशवसुतांना क्रान्तीचे श्रेय देताना ते म्हणतात, " स्फुट भावगीतात्मक लिहिणे, अशा भावगीतांस अनुरूप मात्रा-वृत्तांचा पुष्कळसा उपयोग करणे, लौकिक व सामाजिक विषयांना काव्यात महत्त्वाचे स्थान देणे, काव्याकडे साधन या दृष्टीने न पाहता साध्य या दृष्टीने पाहणे व सर्वांत महत्त्वाचे म्हणजे काव्यात आत्मलेखन करणे या गोष्टी एकसमयावच्छेदे व नेटाने केशवसुतांइतक्या इतरांनी कोणी केल्या आहेत असे म्हणता येईलसे दिसत नाही. केशवसुतांच्या आधीच्या निकटच्या भूतकाळात या गोष्टी होत नव्हत्या आणि त्यांच्या काली किंवा नंतर लगेच त्या होऊ लागल्या ही घटना लक्षात घेता क्रान्तीने आपल्या अवताराकरता केशवसुतांचा उपयोग करून घेतला एवढे तरी मान्य करावयास अडचण वाटू नये. (पृ. ३९) मराठी कवितेतील क्रांतीसंबंधी व केशवसुतांच्या क्रान्तिकारकत्वासंबंधी जोगांचे हे निष्कर्ष विद्वन्मान्य ठरले आहेत, असेच गेल्या चौदापंधरा वर्षांतील वाङ्मयटीकेकडे बघितले असता आपणांस म्हणावे लागते.

केशवसुतांच्या काव्यनिर्मितीवर जे अनेकविध आक्षेप उत्पन्न झाले होते त्यांचाही यथास्थित समाचार जोगांनी आपल्या ग्रंथात घेतला आहे. ' केशवसुतांची मनोवृत्ती रोगट झाली होती ', ' त्यांना आत्मकवित्वाची रोगट जाणीव असे ', ' त्यांची कविता क्लेसिप्रधान होती ', ' ते एक प्रणय-पीडित आणि गलितोत्साह कवी होते ' ' त्यांना दुरन्त प्रमाथी प्रणयविकाराने ग्रासून टाकले होते ', ' ते हठाकृष्ट कवी होते ' इत्यादी आरोप चांगल्या चांगल्या टीकाकारांनी केशवसुतांवर केले होते. पण त्या आरोपातील अतिशयोक्ती किंवा असत्य जोगांनी साधार दाखवून दिले आणि केशवसुतांना मराठी कवितेतील त्यांचे यथोचित स्थान मिळवून दिले. जोगांच्या ग्रंथानंतर " आता या कवीच्या भवितव्यासंबंधी वस्तुतः चिंता उरली नाही " हे प्रा. श्री. के. क्षीरसागरांचे विधान परमार्थानेच खरे मानावयास हवे (साहित्याच्या दरबारात, पृ. १७ ). केशवसुतांचे अंतिम मूल्यमापन करताना जोगांनी सोनारी ताजवा कसा तोलला ते पाहणेही येथे उद्बोधक ठरेल. त्यात तोललेल्या सोन्याची किंमत तर कळेलच, पण तोलणार्‍या सोनाराची कुशलताही लक्षात येईल. जोग म्हणतात, " केशवसुत महाकवी ठरतील असे वाटत नाही. पण म्हणून त्यांचे काव्य ' हीन ' होते, ते ' अर्ध-कवी ' होते किंवा ' कवीच नव्हते ' असेही ठरणार नाही. समकालीन कवींमध्ये ते श्रेष्ठ होते यात शंका नाही. पटवर्धन ( माधव जूलियन ) म्हणतात-' आधुनिक मराठी कवितेत त्यांचा नंबर पहिलाच आहे. ' हे विधान कदाचित पटवर्धनांच्यामुळेच बाधित होईल; इतरांचा विचार राहोच. समग्र आधुनिक कवितेविषयीचे हे विधान बाधित ठरले, तरी केशवसुतांच्या आगे आणि मागे मिळून अर्धशतकाचा काल घेतल्यास ते खरेच राहील. " " केशवसुतांचे मोठेपण त्यांच्या कवित्वगुणामध्ये पाहण्यापेक्षा मराठी कवितेला त्यांनी जे वळण लावले त्यामध्ये दिसते असे म्हणणे उचित होईल. "( पृ. ३०० )

**' अर्वाचीन मराठी काव्य '**

'अर्वाचीन मराठी काव्य' या ग्रंथात १८८५ते १९४५ या साठ वर्षांच्या कालखंडातील मराठी कवितेचे व्यासंग-परिपूर्ण समालोचन जोगांनी केले आहे. समालोचनासाठी निवडलेली समग्र कविता त्यांनी केवळ वाचलेलीच आहे असे नव्हे, तर अभ्यासलेलीही आहे, हे ग्रंथवाचनाच्या वेळी वारंवार प्रत्ययाला येते. वास्तविक पाहता समालोचनासाठी घेतलेले समग्र वाङ्मय समालोचकाने अभ्यासले पाहिजे, ही समालोचनासंबंधी अगदी प्राथमिक अपेक्षा होय; आणि ती पुरी करणे म्हणजे काही मोठा उल्लेखनीय गुण नव्हे. पण मराठीतील काही समालोचनांत व वाङ्मयेतिहासात हा गुण पुरेसा आढळत नाही, म्हणून जोगांच्या ग्रंथातील या गुणाचा आवर्जून उल्लेख करावयाचा. या ग्रंथात प्रारंभी जोग ' नवीन काव्याचे विहंगम दर्शन' वाचकांना घडवतात आणि त्यात केशवसुतांच्या आधीच्या व नंतरच्या कवितेमधील ( नुकतेच उल्लेखिलेले ) भेद विस्ताराने सांगून नवीन कवितेच्या ठळक वैशिष्ट्यांवर बोट ठेवतात. पुढील सात प्रकरणांत, एकेका कवीच्या काव्याचा परिचय करून देऊन त्या काव्याचे मूल्यमापन त्यांनी केले आहे. हे करीत असता तो कवी कोणत्या संप्रदायातील आहे, त्याच्यावर कोणाच्या लिखाणाचा परिणाम झालेला आहे, त्याच्या काव्याचे पद्य भाषा, वगैरे बाह्यांग कसे आहे, त्याच्या काव्याचे विषय कोणते आहेत, त्यात वाङ्मयीन गुणदोष कोणते आहेत, त्याची वैशिष्ट्ये कोणती आहेत, त्यावर आलेल्या आक्षेपात किंवा त्याविरुद्ध झालेल्या अनुकूल वा

प्रतिकूल टीकेत तथ्य कितपत आहे इत्यादी विविध दृष्टींनी ते विवेचन करतात आणि त्यांचे लिहिणे चांगले अर्थघन होते. निरनिराळ्या कवींची त्यांनी जी स्वरूपवैशिष्टये सांगितली आहेत व त्यांचे जे मूल्यमापन केले आहे त्याविषयी रुचिवैचित्र्यामुळे क्वचित मतभेद होतील, पण त्यांचे लिहिणे पूर्वग्रहदूषित किंवा एकांगी आहे असे कोणालाही म्हणता येणार नाही. भडकपणा किंवा अतिशयोक्ती यांचा आश्रय कोठेही न घेता त्यांनी गुण किंवा दोष सत्यनिष्ठ निर्भयतेने पण हळुवार कुशलतेने दाखविले आहेत. भारदस्तपणा, मार्मिकपणा, संक्षेप आणि काटेकोर शब्दयोजना यांनी त्यांचे सारे विवेचन उजळून निघाले आहे. एकेका कवीचा या प्रकारे परामर्श घेतल्यावर, 'सिंहावलोकन' या शेवटच्या प्रकरणात अर्वाचीन कवितेवर येणाऱ्या आक्षेपांचा ते विचार करतात आणि अर्वाचीन कविता स्वागतार्ह असल्याचे सूचकपणे सांगतात. १९५१ साली ग्रंथाची जी दुसरी आवृत्ती निघाली तिला एक परिशिष्ट त्यांनी जोडले आणि 'नवकाव्या'च्या तात्त्विक भूमिकेचा व वाङ्मयीन रूपगुणांचा त्यात संक्षिप्त समाचार घेतला.

'वस्तुनिष्ठता' आणि 'परिमाणांची विविधता' ही जोगांच्या समालोचनाची सर्वांत महत्त्वाची वैशिष्टये म्हणून सांगता येतील. सौंदर्याची चर्चा करताना 'सौंदर्य वस्तुगत असते' अशी भूमिका त्यांनी घेतली होती. त्यामुळे त्यांचे समालोचन 'वस्तुनिष्ठ' झाले असावे. आणि 'सौंदर्याचे घटक अनेक असतात, सौंदर्याचा आनंदही अनेकविध असतो' अशी भूमिका त्यांनी घेतली होती. त्यामुळे त्यांच्या समालोचनात 'विविध परिमाणे' आली असावी. काव्याचे समालोचन करताना, काव्याचा आपल्यावर तावडतोब कोणता परिणाम झाला त्याचेच वर्णन जोग करीत नाहीत. आपलीच तात्कालिक अनुभूती आपण सांगितली तर वस्तुनिष्ठ सौंदर्याचे ते केवळ आंशिक वर्णन होईल याची जाणीव त्यांना असते. म्हणून काव्याकडे पुनःपुन्हा निरनिराळ्या पातळ्यांवरून ते दृष्टिक्षेप टाकतात आणि जी एकंदर अनुभूती गोळा होईल तिचे कथन करतात. निरनिराळ्या पातळ्यांवरून घेतलेल्या स्वतःच्या अनुभूतीवरच ते विसंबत नाहीत, तर इतरांच्या अनुभूतीही विचारात घेतात; आणि काव्यस्वरूप शक्य तेवढ्या वेगवेगळ्या तऱ्हांनी बघण्याचा प्रयत्न करतात. यामध्ये, काव्यसौंदर्याची जास्तीत जास्त अंगे प्रकट व्हावी हा हेतू असतो आणि त्या सौंदर्यामुळे रसिकांना होणाऱ्या आनंदाचे समग्र दर्शन घडावे असा दुसरा हेतू असतो. व्यक्तिनिष्ठ अनुभूतीमधूनच वस्तुनिष्ठ सौंदर्य उलगडणे भाग असल्यामुळे स्वतःचे विविध पातळ्यांवरील अनुभव व इतरांचे अनुभव यांच्या समन्वयाचा मार्ग त्यांना स्वीकारावा लागतो, हे उघड आहे. यामुळे त्यांचे समालोचन एकीकडे 'वस्तुनिष्ठ' बनते तर दुसरीकडे त्याला 'परिमाणांची विविधता' प्राप्त होते. रसिकांच्या अनेक अनुभूतींचा महत्तम साधारण विभाजक समालोचनाला वस्तुनिष्ठ बनवतो, तर अनेक अनुभूतींसाठी अनेक प्रकारांनी सौंदर्याकडे बघितल्याने परिमाणांची विविधता उत्पन्न होते. जोगांची सौंदर्यशास्त्रीय विचारसरणी आणि त्यांचे साहित्यसमालोचन यांमध्ये हा जो कार्यकारणभाव आहे तो त्यांच्या साहित्य समालोचनाचे रहस्य होय.

वस्तुनिष्ठ सौंदर्य स्वतः अनेक पातळ्यांवरून बघून आणि त्याचे इतरांना घडलेले दर्शन ध्यानात घेऊन जोग जेव्हा त्याचा सामग्र्याने ठाव घेऊ पाहतात तेव्हा त्यांच्या समालोचनात काव्याचे बहिरंग आणि अंतरंग या दोहोंनाही महत्त्व येते. बहिरंगाची नि अंतरंगाची निरनिराळी गुणवैशिष्टये पुढे येतात, त्या गुणवैशिष्टयांचे वेगवेगळे मापन होते, वेगवेगळी मापे सांगितली जातात आणि एकूण समालोचन संमिश्र किंवा बहुंगी बनते. त्यामुळेच, ते केशवसुतांना एकीकडे 'मराठी कवितेला नवे वळण लावणारा क्रान्तिकारक कवी' ठरवतात तर दुसरीकडे 'त्यांच्यामध्ये माधव जूलियन किंवा तांबे यांच्यापेक्षा काव्यगुण कमी होते, असे सूचित करतात. गोविंदाग्रजांपाशी असलेले कल्पनावैभव, प्रेमभावनेचे उत्कटत्व व भाषाप्रभुत्व या गोष्टी ते ठळकपणे दाखवून देतात, तर त्याच वेळी 'गौडी रीतीचा आधुनिक प्रतिनिधी' असा विद्वत्ताप्रचुर रेशमी चिमटाही ते गोविंदाग्रजांना घेतात. बालकवींनी निसर्गविषयक 'अत्यंत सुंदर' कविता लिहिली, त्यांच्या शैलीत माधुर्य व सौकुमार्य हे गुण उत्कर्षाला पोचले होते, असा बालकवींसंबंधी भरघोस गुणगौरवही ते करतात आणि 'मानवी जीवनाचा अभ्यास कर' असे बालकवींना कोणीतरी सांगावयास हवे होते असा मर्मभेदक उल्लेखही बालकवींसंबंधी ते करतात. परिमाणबहुलतेमुळे त्यांचे समालोचन याप्रमाणे संमिश्र किंवा बहुंगी होते आणि ते अधिक सत्यदर्शी बनते हे खरे; पण सत्याच्या अनेक अंगांचे मापन करून त्यांचे कमजास्त प्रमाण एकाच वेळी सांगितल्यामुळे ते कित्येक एकमार्गी वाचकांना पटायला नि पचायला अवघडही होऊन बसते. काव्याचे व्यक्तिनिष्ठ समालोचक स्वतःच्या अनुभूतीला साक्ष

अनुक्रमणिका

ठेवून समालोचन करतात आणि त्यांना एकाच व्यक्तीला, दर्शन घडता क्षणी, एकदम आलेली अनुभूती सांगावयाची असल्याने त्यांचे समालोचन एखाद्या भावगीतासारखे किंवा लघुकथेसारखे वाचकाच्या मनावर एकच एक संस्कार उत्कट पणे उमटवू शकते. अशा समालोचनातील सत्य आंशिक असले तरी ते समालोचन ठसठशीत असते, परिणामकारक ठरते आणि सुंदरही वाटते. जोगांचे समालोचन त्यांच्या विशिष्ट भूमिकेमुळे (-आणि व्यक्तित्वामुळे) कमी परिणामकारक, कमी सुंदर, पण अधिक सत्य होते, असे म्हणणे योग्य होईल. जोगांचा पिंड सौंदर्यनिर्मिती करणाऱ्या कवीचा असण्यापेक्षा सत्यसंशोधन करणाऱ्या शास्त्रज्ञाचा आहे, ही गोष्ट येथे पुन्हा एकदा आठवण्यासारखी आहे.

**नवकाव्यासंबंधी—**

'अर्वाचीन मराठी काव्या'च्या दुसऱ्या आवृत्तीत जोगांनी 'नवकाव्या'चा काही परामर्ष घेतला, नंतर मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या एका वार्षिकोत्सवात नवकाव्यातील 'दुर्बोधतेची मीमांसा' केली आणि ठाणे साहित्य संमेलनातील अध्यक्षीय भाषणातही नवकाव्याला उद्देशून काही मते मांडली. जोगांचे म्हणणे थोडक्यात असे की 'नवकवींची आत्मनिष्ठा ऐकान्तिक आहे. ते इतके आत्मनिष्ठ आहेत की काव्य जसे स्वतःसाठी असते तसेच ते रसिकांसाठीही असते, किंबहुना ते जेवढे 'स्वार्थ' असते त्याहूनही अधिक 'परार्थ' असते, याचा त्यांना बहुंशी विसर पडतो. त्यांच्या कवितेत सौंदर्यापेक्षा सत्यावर किंवा वास्तवावर भर आहे आणि सत्यालाच सौन्दर्य समजण्याची चूक ते करीत आहेत. बरेच सत्य सुंदर असले तरी सर्वच सत्य सुंदर नसते, सत्य व सौन्दर्य ही सर्वस्वी समक्षेत्र नाहीत, ही वस्तुस्थिती ते ध्यानात घेत नाहीत आणि असुंदरालाही काव्यात सन्मानाचे स्थान देतात. आशय आणि अभिव्यक्ती यांचे संबंध वरवरचे नाहीत, हे खरे; पण आशयाशी (किंवा अनुभूतीशी) इमान राखूनही अभिव्यक्ती सुबोध करणे, निदान तसा प्रयत्न करणे शक्य आहे. पण नवकवितेत अभिव्यक्तीबाबतही ऐकान्तिक आत्मनिष्ठा कवी धारण करतात, आपला आशय दुसऱ्याला कळावा अशी काळजी घेत नाहीत, आणि नवकविता दुर्बोध होते. नव्या प्रतिमा, प्रतिमांचा संकर आणि उपमेयांचा अनुल्लेख यांमुळे नवकवितेतील दुर्बोधता वाढत जाते आणि चमत्कृतीच्या हव्यासामुळे तीवर कळस चढतो.' जोगांचे हे म्हणणे नवकाव्याच्या अभिमान्यांना मुळीच रुचलेले नाही आणि प्रा. गंगाधर गाडगीळांसारखे टीकाकार जोगांवर रागावलेलेही आहेत. पण जोगांच्या रसिकतेला काही मर्यादा आहेत हे मान्य केले तरी नवकाव्याविषयी बहुसंख्य मराठी रसिकांच्या ज्या प्रतिक्रिया आहेत त्यांचे प्रतिनिधित्व जोगांनी केले आहे व त्या प्रतिक्रियांना अचूक शब्दरूप दिले आहे, हे नाकारता येणार नाही.

जोगांचे म्हणणे, काही एका मर्यादेपर्यंत नवकाव्याच्या समर्थकांनाही मान्य होऊ शकेल. उदाहरणार्थ, आत्यंतिक आत्मनिष्ठा आणि सत्याचा किंवा वास्तवाचा आग्रह नवकाव्यात आहे, असे ते अभिमानाने म्हणतील आणि नवकाव्य काही काही वेळा दुर्बोध होते, ही गोष्टही ते नाकारणार नाहीत. मात्र त्यावर ते असे प्रतिपादन करतील, की 'आत्यंतिक आत्मनिष्ठा स्वागतार्ह आहे आणि जे सत्य नवकाव्यात सांगितले जाते ते 'भावसत्य' असल्याने सुंदरच असते. किंबहुना, नवकाव्य हा प्रामाणिक आत्माविष्कार असल्याने तो सुंदर की असुंदर हा प्रश्नच अप्रस्तुत आहे.' अभिव्यक्तीसंबंधी ते असे सांगतील, की 'कवीला जी अनुभूती येते तिची अभिव्यक्ती प्रतिमांच्या द्वारे अपरिहार्यपणे होत असते. त्या प्रतिमांनी व प्रतिमांच्या संकरानेही अनुभूतीला मूर्त स्वरूप प्राप्त होते. प्रतिमा नि अनुभूती यांचा संबंध अविभाज्य असतो. जर प्रतिमा बदलल्या (प्रतिमेयाचा किंवा उपमेयाचा आवर्जून उल्लेख केला), आणि प्रतिमासंकर काढून टाकला तर मूळ अनुभूतीच अभिव्यक्त होणार नाही. तेव्हा, रसिकाने नवकाव्याचा 'अर्थ' परंपरागत कवितेप्रमाणे लावीत बसू नये. तिचा एकदम अनुभवच घ्यावा. तो अनुभव हेच नवकाव्याचे उद्दिष्ट नि फल होय.'—नवकाव्याचे समर्थक आणि जोगांसारखे नवकाव्याचे आक्षेपक यांच्यामधील एकमताची मर्यादा जेथून संपते तेथून पुढे कोण बरोबर, कोण चूक असा प्रश्न विचारणे योग्य होणार नाही. मतभेदाच्या त्या क्षेत्रात काव्यविषयक भूमिकाच बदलतात आणि ज्याच्या त्याच्या आवडीचा प्रश्न उत्पन्न होतो. तेव्हा, प्रस्तुत लेखकाची काव्यविषयक भूमिका (सध्या तरी) जोगांसारखी आहे आणि आवड बरीचशी जोगांसारखी तर थोडीशी नवकाव्याच्या समर्थकांसारखी आहे. एवढे सांगून हा विषय येथेच संपविणे बरे.

**'मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन'**

१९५९ मध्ये प्रसिद्ध झालेले 'मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन' हे जोगांचे अगदी अलीकडील समालोचनात्मक ग्रंथलेखन होय. न. चिं. केळकर-स्मारक-

व्याख्यानमालेसाठी त्यांनी हे लेखन केले आणि त्यात १९२० पर्यंतच्या मराठी वाङ्मयाभिरुचीचे दर्शन घडवले. अभिरुचीसंबंधी काही स्थूल अपेक्षा वस्तुनिष्ठ रीतीने सांगता आल्या तरी अभिरुची शेवटी व्यक्तीगत असते, हे जोगांना मान्य आहे. तेव्हा, स्वतःची वैयक्तिक अभिरुची प्रमाण मानूनच मराठी लेखकांच्या अभिरुचीमधले गुणावगुण आणि चढउतार त्यांनी वर्णन केले आहेत. स्वतःची अभिरुची प्रमाण ठरल्यामुळे 'टीका वस्तुनिष्ठच हवी' हा आग्रह या ग्रंथात जोगांना बहुधा जाचला नसावा आणि त्यामुळे त्यांनी बऱ्याच मनमोकळेपणाने लेखन केले असावे. त्यांच्या शैलीला प्रसन्नतेची नि रोचकपणाची जेवढी शीग गाठणे शक्य होते तेवढी तिने या पुस्तकात गाठलेली आहे, असा सुखद अनुभव साहजिकच ग्रंथ वाचताना पदोपदी येतो. आपल्याकडील जुन्या लेखकांनी समकालीन उपलब्ध वाङ्मयावर सविस्तर अभिप्रायलेखन केलेले नाही यामुळे अभिप्रायात प्रत्यक्ष व्यक्त झालेल्या अभिरुचीचे समीक्षण करण्यापेक्षा त्या लेखकांच्या वाङ्मयनिर्मितीत अप्रत्यक्ष अनुस्यूत असलेल्या त्यांच्या अभिरुचीसंबंधी कयास बांधावयाचा, असा मार्ग जोगांना स्वीकारावा लागला. तेव्हा त्यांनी निरनिराळ्या लेखकांच्या वाङ्मयनिर्मितीचे बाह्यांग आणि अंतरंग तपासले आणि त्यांत त्यांची जी अभिरुची दिसली तिचे वाचकांना दर्शन घडवले. हे करीत असताना विशुद्ध वाङ्मयीन दृष्टी त्यांनी कोठेही सोडली नाही 'प्रास्ताविक निवेदना'त त्यांनी म्हटल्याप्रमाणे "मराठी वाङ्मयाचा विचार धार्मिक, सामाजिक, ऐतिहासिक व तत्त्वज्ञानाच्या भूमिकांची वाङ्मयीन भूमिकेशी गल्लत करूनच अनेक वेळा" झालेला होता. त्यामुळे, आध्यात्मिक, राजकीय वगैरे अन्य क्षेत्रांतला लेखकांचा मोठेपणा त्यांच्या वाङ्मयाला येऊन चिकटला होता किंवा समालोचकांच्या वाङ्मयेतर भूमिकेमुळे लेखकांच्या वाङ्मयीन मूल्यमापनामधले तारतम्य ढळले होते. पण जोगांनी वाङ्मयीन अभिरुचीचा एकमेव विचार अथपासून इतिपर्यंत घट्ट धरून ठेवल्यामुळे पूर्वकालीन समालोचकांची चूक त्यांच्या हातून कुठेही झाली नाही. त्यांच्या 'विहंगमावलोकना'मुळे मराठी वाङ्मयाभिरुचीचे एक स्पष्ट, सलग नि सुंदर चित्र महाराष्ट्राला उपलब्ध झाले, यात शंका नाही.

ज्ञानेश्वरांच्या वेळी वाङ्मयीन अभिरुची उच्च नि अभिजात होती; पण पुढील संतकवींत तिचा दर्जा थोडाफार घसरला; पंडितकवींत तो आणखी घसरला; आणि शाहीरकवींत तिने अधःपाताची शेवटची पायरी गाठली; — असा जुन्या वाङ्मयासंबंधी जोगांचा निष्कर्ष आहे. त्यांच्या मते, आंग्लाईतील नव्या वाङ्मयात इंग्रजीच्या परिणामामुळे अभिरुची एकदम सुधारली आणि न. चिं. केळकरांमध्ये तिने एक उन्नत आदर्श दाखवून दिला. अभिरुचीच्या चित्राच्या या मुख्य रूपरेषेमध्ये त्यांनी अनेक जुन्यानव्या लेखकांसंबंधी लिहिले आहे आणि त्यांच्या अभिरुचीमधील गुणावगुणांचे रंग उलगडून दाखविले आहेत. हे रंग बघताना अनेक परिचित लेखकांचे थोडेफार नवे दर्शन वाचकांना होते आणि त्या त्या लेखकांचे महत्त्व थोडे वाढते किंवा कमी होते. काही लेखकांच्या एकंदर महत्त्वात फरक पडला नाही तरी त्यांच्या लेखनाची जी विविध अंगे त्यांमधील महत्त्वक्रम वरखाली होतो. महत्त्वक्रमाची ही पिचणी कशी होते ते जोगांनी जी वैशिष्ट्यपूर्ण मते जागोजाग मांडली आहेत त्यांपैकी काही बघितली म्हणजे स्पष्ट होऊ शकेल. रामदासांच्या लेखनात विचारांचे सौंदर्य आहे, त्यातील आशय उत्कट आणि भव्य आहे, हे जोग सविस्तर वर्णन करून सांगतात; पण रामदासांच्या लेखनात ओजोगुणाची तीव्रता असह्य होण्याइतकी वाढलेली आहे हेही ते दाखवून देतात. शिवाय, रामदासांची रचना कमालीची शिथिल आहे, त्यांची भाषा अशुद्ध आहे, त्यांना यमकांची नि शब्दचमत्कृतीची एक विचित्र हौस आहे इत्यादी दोषांवरही ते बोट ठेवतात. ते म्हणतात "धसमुसळेपणा हे जर ईश्वरत्वाचे लक्षण असेल, तर रामदास हे शब्दसृष्टीचे ईश्वर खास म्हणावे लागतील." (पृ. १०८) तुकाराम महाराजांमध्ये कळकळ नि भावनांची उत्कटता हे फार मोठे वाङ्मयीन गुण होते, हे त्यांनी मान्य केले आहे; पण माधुर्याचा व सौकुमार्याचा अभाव, उत्कट भावनेमधील असहिष्णुत्वाची झाक, क्वचित येणारी दुर्बोधता, 'वेडेवाकुडे गाईन' ही वृत्ती, संकोचशून्यता इत्यादी त्यांच्या दोषांवर टीकास्त्र चालविले आहे. वामनपंडितांच्या कवितेतील अश्लीलतेवर त्यांनी आघात केला आहे आणि कथेत वारंवार अध्यात्म घुसडण्याच्या त्यांच्या खोडीबद्दल असे उद्गार काढले आहेत, की "हरीविण कथा किंवा कविता 'अलवण' म्हणजे मिळमिळीत होते हे वादाकरिता कबूल केले, तरी... अध्यात्माचे लवण 'अधिकस्य अधिकं फलम्' ह्या न्यायाने वाढवीत गेल्याने वामनपंडितांच्या वनसुधा आणि वेणुसुधाही लवणांबू झाल्याचा प्रत्यय अनेक रसिकांना येतो." (पृ. १२५) श्रीकृष्णाच्या रासक्रीडेची जी शृंगारिक वर्णने पंडितकवींनी केली त्यांची जोगांनी उडविलेली रेवडी

मुळातूनच वाचावी इतकी अप्रतिम आहे. (पृ. ९७) पंडितकवींच्या वृत्तप्रभुत्वाचा फुगा त्यांनी साफ फोडला आहे आणि असे म्हटले आहे की " निर्दोष सफाईदार वृत्तरचना करण्याचे सामर्थ्य एक मोरोपंत सोडल्यास इतर पंडितकवींत होते असे वाटत नाही." (पृ. १२९) शाहिरी वाङ्मयातील शृंगाराबद्दल बोटचेपे बोलून त्याचे छुपे कौतुक करण्याचा मार्ग त्यांनी धिक्कारला आहे आणि तो शृंगार अत्यंत अश्लील नि हिडीस होता अशी त्याची रोखठोक संभावना केली आहे. रामजोश्यांच्या कवित्वाची नि वैराग्यप्रतिपादनाची आजवर अनेकांनी तारीफ केली आहे; पण त्याबद्दल ते लिहितात, की "वैराग्यप्रतिपादनात मोठ्याने ओरडले की परिणाम होतो असे जोशीबुवांस वाटत असावे, असे दिसते" (पृ. १००) लोकहितवादींच्या लेखात 'लोकांस मूर्खपणा फार' हे जे पालुपद असे त्याचा उल्लेख करून लोकहितवादींच्या लेखनपद्धतीबद्दल ते म्हणतात, की "तिच्यामागे कळकळ असली, तरी प्रेम असल्यासारखे दिसत नाही, सौजन्य तर नाहीच नाही." (पृ. २०८) विष्णुशास्त्री चिपळूणकरांची अभिरुची "बहुतांशी निकोप आणि सत्" होती असा निर्वाळा ते देतात; मराठी वाचकवर्गाला अभिरुचीचे शिक्षण चिपळूणकरांइतके दुसऱ्या कोणी दिले नाही हे ते निदर्शनास आणतात; पण त्याबरोबर चिपळूणकरांसंबंधी पुढील वाक्येही लिहिण्यास ते मागेपुढे पाहत नाहीत. "औपरोधिक लेखनामुळे लोकप्रियता जसजशी मिळत गेली तसतशी तिची चटक (चिपळूणकरांत) वाढत गेली. अहंकाराचा प्रादुर्भाव झाला... सदभिरुचीचे एक गमक जे सौजन्य ते क्षीण होऊ लागले" (पृ. २१६)-जोगांची या प्रकारची मते आणि त्यांमागील साधार युक्तिवाद वाचल्यानंतर मराठी अभिरुची आणि निरनिराळ्या मराठी लेखकांचे मूल्य यांविषयी ज्याच्या विचारांत काही ना काही फरक पडणार नाही असा वाचक सापडणे कठीण.

'विहंगमावलोकनातील' मराठी वाङ्मयाभिरुचीचे वर्णन वाचीत असता खुद्द जोगांच्या अभिरुचीचा प्रत्यय वाचकांना पदोपदी येतो; कारण स्वतःची अभिरुचीच जोगांनी सर्वत्र प्रमाण मानलेली आहे. जोगांची ही अभिरुची सौंदर्याची भोक्ती नि संस्कारसंपन्न आहे, याविषयी दुमत होणार नाही. तिला काव्याच्या अंतरंगाचे जसे महत्त्व वाटते तसेच बहिरंगाचेही वाटते. बहिरंगाविषयी ती जरा जास्तच चोखंदळ आहे. त्यामुळे भाषिक अशुद्धता, वृत्तदोष किंवा बांधणीतला बेढौल तिला अगदी खपत नाही. प्रस्तुतात अप्रस्तुत घुसले की तिच्या डोळ्यांत ते खुपत राहते. तिला मोजक्या अर्थालंकारांची आवड आहे, व्यंजना आणि मार्मिकपणा यांचे तिला आकर्षण आहे, पण चमत्कृती किंवा कसरत यांचा तिला तिटकारा वाटतो. काव्यातील भावोत्कटता तिला हवी आहे, पण त्या भावोत्कटतेचे तिला 'वेड' आहे असे वाटत नाही. ओजोगुणाला ती दिपते आणि सूर्याच्या प्रखर तेजापेक्षा चंद्राचे शीतल प्रकाशणे तिला प्रिय होते. भोळ्या भावात एक तऱ्हेची गोडी आहे हे तिला माहीत आहे, पण भोळ्या भावापेक्षा व्यासंग नि विद्वत्ता यांनी मंडित झालेल्या भावावर तिचा जीव जडलेला आहे.' आरुष बोलापेक्षा 'नागर पदबंध' तिच्या पसंतीला उतरतात. औचित्यविवेक आणि संयम हे तर तिचे श्वासोच्छ्वास होत. त्यामुळे वेहोपीच्या पंखांवर स्वार होऊन धुंद जिणे जगावे हा तिचा स्वभाव नाही. ती मध्यम क्रमानेच नित्य माफक भरारी घेईल आणि क्वचित फार उंच गेलीच तर चपापून खाली उतरेल. थोडक्यात, ती गौडी नाही, वैदर्भी आहे; रोमँटिक नाही, क्लासिकल आहे. 'विहंगमावलोकन' वाचणाऱ्या वाचकाची अभिरुचीही त्याला नकळत जोग थोडीफार आपल्यासारखीच बनवतात.

## समारोप

'चर्वणा' हा जोगांच्या स्फुट लेखांचा पहिला संग्रह १९६० साली प्रसिद्ध झाला असून 'विचक्षणा' हा दुसरा संग्रह १९६२ च्या डिसेंबरमध्ये अलीकडेच बाहेर पडला आहे. पण जोगांच्या ग्रंथांसंबंधी इतक्या विस्ताराने लिहिल्यानंतर त्यांच्या स्फुट लेखांसंबंधी आणखी काही लिहावयास पाहिजे असे नाही. शिवाय स्थलाभावी ते शक्यही नाही. तेव्हा ह्या 'वाङ्मयदर्शना'चा समारोप येथेच केला तर ते उचित ठरेलसे वाटते.

समारोपादाखल असे म्हणता येईल, की जोगांनी प्रारंभकालात जरी थोडे काव्यलेखन केले असले तरी कवी ही वाङ्मयक्षेत्रातील त्यांची खरी भूमिका नव्हे. ते मुख्यतः साहित्यशास्त्र व सौंदर्यशास्त्र यांचे प्रवर्धक आहेत आणि मराठी कवितेचे समालोचक आहेत. उत्कृष्ट व्यासंग, खोल व्यापक नि सूक्ष्म विचार, निर्भय पण शालीन वृत्ती आणि मार्मिक रसिकता हे त्यांच्या साऱ्या वाङ्मयनिर्मितीचे विशेष होत. साहित्यशास्त्र, सौंदर्यशास्त्र आणि साहित्यसमालोचन या तीन क्षेत्रांत मराठी वाङ्मयाला त्यांनी संपन्न केले आणि मराठी टीकेची पातळी खूप उंच नेली. त्यांच्या हातून भावी कालात कोणते वाङ्मयकार्य होणार, याकडे महाराष्ट्रातील वाङ्मयप्रेमी जनता उत्सुकतेने बघत आहे, यात आश्चर्य नाही.



# मराठी मूर्धन्यांची पार्श्वभूमी

ग. वा. तगारे

ज्यांना व्याकरणपरिभाषेत ‘ मूर्धन्य ’ किंवा टवर्ग म्हणतात त्या मराठी वर्णोच्चाराच्या पार्श्वभूमीचा या लेखात विचार केला आहे. ‘ मूर्धन्यव्यंजने द्राविडीभाषांतून आर्योद्भव भाषांत आली आहेत ’, ‘ मराठी मूर्धन्यांचे दोन तऱ्हेचे उच्चार ऐकू येतात ’ इ. विधाने व्याकरण व भाषाशास्त्र यांवरील ग्रंथांत आढळतात ती कितपत बरोबर आहेत ? मराठी मूर्धन्यवर्णाचा विकास व इतर भाआ. ( भारतीय-आर्य ) भाषांतील मूर्धन्यांचे होणारे भिन्न उच्चार यांचा काय संबंध आहे ? इत्यादि समस्या मराठी मूर्धन्यांबद्दल तावडतोब दृष्टीसमोर येतात. त्यांची उकल करण्यास या मराठी वर्णोच्चारांची ऐतिहासिक पार्श्वभूमी समजून घेणे आवश्यक आहे.

## प्राचीन वर्णन

प्रातिशाख्यकारांच्या मते ट- वर्गाचा उच्चार ‘ प्रतिवेष्टित ’ ( retroflex ) आहे.[१] शिक्षाग्रंथातून हा ( ट वर्गाचा ) उच्चार जिह्वाग्राने न करता ‘ जिह्वोपाग्राने होतो असे म्हटले आहे[२]. क-च-त-प वर्गातील स्पर्शोच्चारणात होणाऱ्या ‘ आभ्यन्तर ’ किंवा ‘ आस्य ’ प्रयत्नापेक्षा अधिक प्रयत्न ट वर्गाच्या वेळी करावा लागतो. ही उच्चारभिन्नता व्यासशिक्षेत ( २८८ ) पुढीलप्रमाणे व्यक्त केली आहे :

> कवर्गादिषु जिह्वादि-मध्यान्तोष्ठेन चोपरि ।
> ट-वर्गे वक्त्र-मध्येन जिह्वाग्रेण यथा स्पृशेत् ।।

मराठीचा विकास भारतीय आर्य व युरोपीय भाषा यांचे पूर्वरूप :–‘ प्राचीन भारत युरोपीय ’ ( प्राभायु. )→ भारतीय आर्य व पारसीक भाषांचे प्राचीन रूप ‘ प्राभापा ’ ( प्राचीन–भारत पारसीक )→प्राभाआ. ( प्राचीन भारतीय आर्य ) अथवा ‘ संस्कृत ’→मभाआ. ( मध्ययुगीन भारतीय आर्य अथवा ‘ प्राकृत ’ व ‘ अपभ्रंश ’ ) या अवस्थांतून झाला आहे. त्यांपैकी प्राभायु. व प्राभापा. या अवस्था ‘ अनुमित ’ असल्यामुळे त्यात मूर्धन्य उच्चारण नव्हते हे भाषापंडितांचे मत मान्य करू व ही उच्चारणप्रवृत्ती भारतीय आर्यभाषांनी आर्येतर भाषांतून उचलली का भाआ. भाषांचा हा आंतरिक विकास याचा विचार करू.

## प्राभाआ. मधील मूर्धन्य.

वेदभाषेतील मूर्धन्यांचा पुढीलप्रमाणे विकास झाला :

( १ ) प्राभायु. तालव्य क् ( k̂ ), ग् ( ĝ ), घ् ( gĥ )+दन्त्य या संयुक्ताचे मूर्धन्यीकरण.

उदा. :–प्राभायु.*√दिक्+तो ( क. भू. धा. वि. प्रत्यय ) >सं. दिष्ट.

प्राभायु.*√लिघ्+तो>सं. लीढ ( चाटलेले )

( २ ) प्राभायु. तालव्यापासून आलेले प्राभाआ.–ज्,-श्,–ह् यांचा शब्दाच्या अंती होणारा मूर्धन्यासारखा उच्चार :

उदा. राज्>प्रथमा ए. व. राट्
विश् ‘ वसति ’> ,, विट्
वह् ‘ नेणे ’>तृ. भू. तृ. पु. ए. व. अवाट्

( ३ ) प्राणायु. शब्दात–स्–श, आणि–ज् चा

---

१ उदाहरणार्थ :

जिह्वाग्रेण प्रतिवेष्ट्य मूर्धनि टवर्गे ।
—तैत्तिरीय प्रातिशाख्य २.३७

मूर्धन्याः प्रतिवेष्ट्याग्रम् ।
—वाजसनेयी प्रातिशाख्य १.७८

मूर्धन्यानां जिह्वाग्रं प्रतिवेष्टितम् ।
—अथर्व प्रातिशाख्य १-२२

२ आपिशलि-शिक्षा २.६-७

अनुक्रमणिका

होणारा–ष् व त्यामुळे त्यानंतर येणाऱ्या–त्, थ चे–ट्,–ठ् उच्चारण :

उदा. दुस्+तर>दुष्टर ‘ अजिंक्य ’
वश्+ति>वष्टि ‘ इच्छा करतो ’
मृज्+त>मृष्ट

( ४ ) वेदभाषेमध्ये ऋ–,र्–,अथवा ल्–+दन्त्य असे संयुक्त व्यंजन आले असता दन्त्य व्यंजनाऐवजी मूर्धन्य–वर्ण आलेला आढळतो. या मूर्धन्यांना ‘ वेदभाषेतील मभाआ. ( प्राकृत ) प्रवृत्ति ’ मानून मॅक्डोनेल ( Vedic Grammar § ४२ ब ) व एड्जर्टन ( Sanskrit Historical Phonology §§ ४२–४४ ) यांनी या मूर्धन्यांचे स्वतंत्र स्थान दर्शविले आहे.

सारांश, वरील प्राभाआ. कालातील मूर्धन्य वर्ण हे भारतीय–आर्यभाषांचा स्वाभाविक विकास असल्यामुळे या ठिकाणी आर्येतर भाषांतील उसनवारी मानण्याचे कारण नाही.

## मभाआ. ( मध्ययुगीन भारतीय आर्य ) भाषांतील मूर्धन्य

खि. पू. ६०० पासून इ. स. १००० पर्यंत १६०० वर्षांच्या काळात संस्कृत आणि मराठी, हिंदी इ. अभाआ ( अर्वाचीन भारतीय आर्य ) भाषा यांचा दुवा सांधणाऱ्या ‘ प्राकृत ’ भाषा रूढ होत्या. पाली, अर्धमागधी, काव्य-नाटकांतील प्राकृत, शिला–ताम्रलेखांतील प्राकृत इ. भिन्न नावांखाली या भाषिक प्रवृत्ती रूढ असून त्यांचा स्थानिक अथवा प्रादेशिक व कालिकविकास आता अभ्यासला गेला आहे.[3] मराठी भाषेच्या दृष्टीने ‘ महाराष्ट्र ’ म्हणून सामान्यतः ओळखल्या जाणाऱ्या भूप्रदेशांत सापडलेले प्राकृत शिलालेख, रचले गेलेले ‘गाथासप्तशती’-सारखे प्राकृत ग्रंथ व पुष्पदंत–कनकामर या कवींचे ‘ अपभ्रंश ’ वाङ्मय यांतील मूर्धन्य वर्णांचा विकास लक्षात घेतला की मराठी मूर्धन्य उच्चारणाची पार्श्वभूमी स्पष्ट होईल.

या कालखंडात प्राभाआ. पेक्षा मूर्धन्यांचे प्रमाण अधिक वाढले असले तरी ही वाढ सावकाश होत गेली. या काळात दन्त्यांचे मूर्धन्यीकरण होण्याचे पुढील प्रकार निर्माण झाले:

१. प्राभाआ. किंवा संस्कृतप्रमाणे मूर्धन्य ऊष्मा, ऋ, र् किंवा ल् + दन्त्य ∠ मूर्धन्यीवर्ण

२. दन्त्यवर्ण आणि ऋ, र् अथवा ल् यांच्या दन्त्या-आधीच्या संनिकर्षामुळे झालेले मूर्धन्यीकरण

३. दन्त्य + ऋ, र् ( अथवा ल् ) >मूर्धन्य

४. वरील कारणाव्यतिरिक्त आपोआप झालेले ‘ नैसर्गिक मूर्धन्यीकरण’ ( Spontaneous Cerebralisation )

या कालात भिन्न प्रांतांत निरनिराळ्या आर्यबोली चालू होत्या. वाङ्मयभाषा व लेखभाषांमधून या बोलींचा संकर स्पष्ट दिसत असला तरी वर उल्लेखलेल्या भाषिक प्रवृत्ती भिन्न प्रांतांत भिन्न गतीने पसरत होत्या. उदाहरणार्थ महाराष्ट्रापुरता विचार करता, ( डॉ. मेहेंदळ्यांच्या विवेचना-वरून ) खि. पू. ३०० ते खि. श. ४०० या काळातील शिलालेखांवरून ( मूर्धन्यवर्ण व ) मूर्धन्यीकरणाबद्दल पुढील प्रवृत्ती आढळतात :

### ( अ ) मूर्धन्य वर्णांचे बदल

| भाषिक प्रवृत्ती | काल |
|---|---|
| ( १ )–ट्–>–ड्– | खि. पू. २०० |
| ( २ )–ठ्–>–ढ्– | खि. श. २०० |
| ( ३ )–ड्–>–ळ्–,–ल्– | खि. श. १०० |
| ( ४ )–ड्–>–द्– | खि. पू. १०० |
| ( ५ )–ण्–कायम | खि. पू. ३०० ते खि. श. २०० |

### ( आ ) मूर्धन्यीकरण

| भाषिक प्रवृत्ती | काल |
|---|---|
| ( १ ) ऋ–त्–>ट्–त्– | खि. पू. १०० |
| ( २ )–र्त्–>–ट्– | खि. श. १०० |
| ( ३ )–र्थ्–>–ठ्–,–थ्– | खि. पू. १०० |
| ( ४ )–र्ध्–>–ढ्–,–ध्– | खि. पू. ३०० |

३ या विभागाचे आधारग्रंथ
पिशल – Grammatik der Prakrit Sprachen
गायगर – Pali Literatur und Sprache
A. M. घाटगे – Introduction to Ardhamagadhi
M. A. मेहेंदळे – Historical Grammar of Inscriptional Prakrits
J. Bloch – L'indo·aryen
– Some Problems of Indo–Aryan Philology
– La Langue marathe
S. K. चतर्जी – Origin and Development of the Bengali Language
ग. वा. तगारे-A Historical Gram mar of अपभ्रंश

अनुक्रमणिका

(५)-स्त्->-ट्- खि. पू. २००
(६)-स्थ्->-ट्ठ्- खि. पू. ३००
(७)-स्थ्->-ट्- खि. पू. २००
(८)-न्->ण्-क्वचित् खि. पू. १००
(९)-न्->-ण्-,-न्- खि. पू. ३००

वरील कोष्टकाचा अर्थ इतकाच की वरील भाषिक प्रवृत्ती महाराष्ट्राच्या परिसरातील प्राकृत शिलालेखांत विशिष्ट कालांत खोदल्या गेल्या. तत्पूर्वी बोलभाषेत त्या किती काळ होत्या हे सांगता येत नाही.

### अपभ्रंशातील मूर्धन्यीकरण

शिलालेखांपेक्षा वाङ्मयात भाषिक संकर फार मोठ्या प्रमाणावर आढळतो. अपभ्रंश वाङ्मय व प्राकृत यांतील शब्दसंपत्ती पुष्कळ अंशी एकच आहे. तसेच भारताचा प्राच्यभाग वगळल्यास उरलेल्या भागातील अपभ्रंश ग्रंथांत भाषिक साम्य पुष्कळ प्रमाणावर आहे. तथापि महाराष्ट्राच्या परिसरात रचले गेलेले अपभ्रंश वाङ्मय महाराष्ट्रातील जनतेला समजण्यासाठी व समजण्याजोगे असणे स्वाभाविक असल्यामुळे ते महाराष्ट्रातील तत्कालीन बोलीला जवळचे होते असे मानणे वावगे ठरणार नाही. या अपभ्रंशात पुढील परिस्थितीत दन्त्याचे मूर्धन्यीकरण होई :

(१) -ऋ + दन्त्य>
(अ) मूर्धन्य – वृद्ध> वड्ड (जुने मराठी 'वाड')
(आ) दन्त्य – कृत> कय> मराठी : के-लें

(२) -र्- + दन्त्य>
(अ) मूर्धन्य–श्रिथिर> ढिल्ल 'ढिला'
(अ) दन्त्य– प्रतिज्ञा> पइज्ज 'पैज' पइज्ज

(३) -र्+ दन्त्य>
(अ) मूर्धन्य : वर्तुळ> वट्टुल 'वाटोळे'
अर्ध+ तुर्थ>आहुट्ठ'औट ३½'
छर्द्>छंड्ड 'सांडणे'
सार्ध> सड्ड 'साडे' (उदा. साडे-तीन) इ.
(आ) दन्त्य : कर्तरी> कत्ती 'कातरी'
अर्द्धार्ध> अद्धद्ध

(४) दन्त्य+ र् ->
(अ) मूर्धन्य : अ-पवित्र–ल> विट्टाल 'विटाळ'
पण अशी उदाहरणे फार कमी
(आ) दन्त्य : क्षेत्र> छेत्त 'शेत'
अन्त्र>अंत–'आंतडे'
निद्रा> निद्द जु. मराठी 'निद-'
रंध्र> रंध

(५) द्वित्वरान्तर्गत दन्त्य :

फक्त मूर्धन्यीकरणाची उदाहरणे घेतली आहेत:

√पत्>पड 'पडणे,' √द्र्>डर 'डरणें'

√कथ् > कढ 'कढणें'

पण सामान्य प्रवृत्ती मात्र दन्त्य कायम राखून त्यांचे घोषवर्ण (त्>द्, थ् >ध्) किंवा लोप करण्याकडे होती.

सारांश या विभागात प्राकृत व अपभ्रंश वाङ्मयात मूर्धन्यीकरण एकाच पद्धतीने होत गेले व महाराष्ट्रात मूर्धन्यीकरणाचा प्रसार सावकाश पण निश्चितपणे वाढत्या प्रमाणावर झाल्याचे आढळते. हे मूर्धन्यीकरण (अ) परिस्थितिजन्य आणि (आ) नैसर्गिक किंवा अकारण (Spontaneous) असे दोन प्रकारचे होते. यांपैकी (अ) परिस्थितिजन्य मूर्धन्यीकरणात ऊष्मवर्ण, किंवा ऋ अथवा र् यांचे साहचर्यामुळे उच्चारस्थानावर परिणाम होऊन नैसर्गिक रीतीने हे मूर्धन्य उच्चार होत. लोकसंकर (Subtratum theory) हे कदाचित दुय्यम-तिय्यम दर्जाचे कारण असेल. मभाआ. चे उत्तरार्धात नैसर्गिक मूर्धन्यीकरण वाढत गेले. याच कालात 'देश्य' शब्दांना वाङ्मयात मान्यता मिळाल्यामुळे साम्याभास, सवर्णापत्ती इ. कारणांनी आद्यस्थानी दंत्य व मूर्धन्य असणारी जोडरूपे व मूर्धन्यांनी आरंभ होणारे शब्द या काळात रूढ झाले. अव्युत्पाद्य देश्य शब्दांतील मूर्धन्य, व सहजस्फूर्त (Spontaneous) मूर्धन्य यांवर आर्येतरभाषांचा परिणाम वा उसनवारी मान्य करण्यास हरकत नाही. तथापि मभाआ. कालाच्या शेवटी महाराष्ट्रात निर्माण झालेल्या अपभ्रंश वाङ्मयात आलेले मूर्धन्य तपासता (अव्युत्पाद्य व आर्येतर देशी शब्द वगळल्यास) मूर्धन्य उच्चार हा भाआ. भाषेचा अंतर्गत, नैसर्गिक विकास आहे असे दिसते. समकालीन भारत युरोपीय भाषांत तो न होता भारतात दृग्गोचर होण्याचे कारण आर्यपूर्व आर्येतर (मुंड व द्राविडी) भाषांत मूर्धन्य वर्ण अस्तित्वात असल्यामुळे या देशात मूर्धन्यांचे प्रकटन (Characterisation) होण्यास अनुकूल क्षेत्र मिळाले. सर्व मूर्धन्यांना 'अनार्य', 'परभाषा ऋण, मानण्यापूर्वी भाभा. भाषांतील वेदभाषेपासून उपलब्ध असलेल्या प्रवृत्तींचा व पुराव्याचा विचार करावा.

# बखरींतील सुभाषितें, वाक्संप्रदाय व म्हणी

र. वि. हेरवाडकर

बखरयुग हे मराठी गद्यसारस्वताच्या इतिहासातील एक महान पर्व होय. बखरसाहित्याने आधी आपला वाक्प्रपंच नेटका केला आणि मगच राष्ट्रहिताचा परमार्थविवेक घेतला. बखरींनी राष्ट्रीय आदर्श निर्माण करून महाराष्ट्राचा ऐतिहासिक आत्मा घडविला. बखरगद्यात इतिहास व वाङ्मय यांचे ओजस्वी प्रतिबिंब जसे पडलेले दिसते तसे बखरपूर्व गद्यात क्वचितच दिसते. बखरींचे चैतन्यपूर्ण विषय व बखरनवीसांचे लेखनकौशल्य यांचे असे काही अद्‌भुत साहचर्य निर्माण झालेले आहे की त्यामुळे बखरींची श्रीमंती ही केवळ आश्चर्याची बाब झालेली नसून अभिमानाचीही बाब झालेली आहे. वाङ्मयलेखनाची भूमिका नसतानाही बखरींचे सौंदर्य, त्यांतील भावनात्मकता, विचारात्मकता, सहजता, संयम इत्यादि गुणांत उत्कटतेने प्रत्ययास येते. या गुणांचे अंगभूत घटक म्हणजे सुभाषिते, वाक्संप्रदाय व म्हणी हे होत. बखरींच्या या अंगाचे येथे विवेचन करावयाचे आहे.

**सुभाषितांचे स्वरूप**

सुभाषिते हा संस्कृत साहित्याकडून मराठीला मिळालेला वारसा आहे. संस्कृत भाषेत सुभाषित हा स्वतंत्र वाङ्मय-प्रकार मानिलेला नसला तरी तो आपल्या गुणांमुळे एका निराळ्या वाङ्मयप्रकाराच्या योग्यतेचा दिसून येतो. संस्कृतात सुभाषितांचे दालन अत्यंत समृद्ध असे आहे. सुटसुटीतपणा व स्वयंपूर्णता यामुळे संस्कृत काव्यनाटकांत त्याचे विलोभनीय स्वरूप आढळते. सुभाषितांची उपयुक्तता ही कोणत्याही प्रसंगी अनुभवास येते. तात्यासाहेब केळकरांनी त्यांना खिशातल्या बॅटरीची उपमा दिली आहे. ते म्हणतात, ' बॅटरी जशी जरूर तेथे जरूर तेवढाच प्रकाश पाडते व तिला वाळगायचे श्रमही फार लागत नाहीत, त्याप्रमाणे सुभाषितांचे आहे. सुभाषितात बोध आहे, मोद आहे, करमणूक आहे, मनःसमाधान आहे, ज्ञान आहे. काय नाही हेच सांगता येत नाही.'

' सुभाषित ' या शब्दाचा यौगिक अर्थ ' चांगले भाषण ' असा आहे. ' सुप्रलाप ', ' सुवचन ' व ' सूक्ति ' हे त्याचे पर्यायी शब्द आहेत; परंतु हा अर्थ निश्चितार्थ-बोधक नाही. संस्कृतातील सुभाषिते बहुतेक पद्यात्मक असल्यामुळे अर्थदृष्ट्या ती जशी अव्याप्तिदूषित आहेत तशीच ती देवतावर्णनात्मक, व्यवहारस्तुतीपर किंवा राजप्रशंसापर असल्यामुळे अतिव्याप्त स्वरूपाची मानावयास प्रत्यवाय नसावा. एवढे मात्र खरे की, सुभाषितात काहीतरी चमत्कृती असेल तरच त्यास सुभाषित म्हणता येईल. शब्दचमत्कृतीपेक्षा अर्थचमत्कृती हे सुभाषिताचे खरे स्वरूप होय. भाषेत रमणीयता निर्माण करण्याचे कार्य सुभाषितांच्याद्वारे होते ते यामुळेच. इंग्रजीत सुभाषित व विनोद यांचा विचार वक्तृत्वशास्त्रात (Rhetoric) केलेला आढळतो तर संस्कृतमध्ये साहित्यशास्त्रात त्यांची चर्चा केलेली आहे. वरील दोन्ही भाषांतील साहित्यांत त्यांना स्वतंत्र असे स्थान नाही.

**बखरींतील सुभाषिते**

मराठी बखरीत विविध प्रसंगांच्या संदर्भात संस्कृत-सुभाषितांचा समर्पक उपयोग केल्याचे दिसते. उदाहरणार्थ, सभासदाच्या बखरीत

जितेन (जयेन ?) लभते लक्ष्मीं मृत्युनापि सुरांगनाः ।
क्षण-विध्वंसिनी काया का चिंता मरणे रणे ?॥

हा श्लोक अफजलखान शिवाजीवर चालून आल्याच्या प्रसंगी दिलेला आहे. या वेळी महाराजांना असे स्वप्न पडले की भवानीच्या कृपेने त्यांच्या हातून खानाचा नाश होणार व त्यांस यश मिळणार. हे स्वप्न महाराजांनी आपल्या भोवतालच्या मंडळीस सांगितल्यानंतर असे न घडले तर काय ? असा सर्वांस पेच पडला. त्या वेळी महाराजांच्या तोंडी वरील वचन आहे. त्याचा आशय असा की, युद्ध केल्यास जय नि प्राणनाश झाल्यास कीर्ती म्हणून क्षणभंगुर अशा देहाचा रणात नाश होण्याची काळजी काय म्हणून ? सदर दारुण प्रसंग व प्रस्तुत वचनातील तत्त्वज्ञानाचे गांभीर्य या दोहोंच्या औचित्यपूर्ण संयोगामुळे हे वर्णन परिणाम-कारक वाटते. या सुभाषितांतील विचार महाराजांच्या निश्चयी व्यक्तित्वावर प्रकाश टाकतो. इतकेच नव्हे तर त्यांच्या वैचारिक सामर्थ्याची तो स्पष्ट कल्पना आणून देतो. चाणक्य नीतीतील हे वचन थोड्या फरकाने याच संदर्भात शेडगावकर बखरीत आलेले आहे.

सर्वांत अधिक सुभाषिते (सुमारे २०) शिवदिग्विजय या बखरीत आढळतात. अंतर्गत वेतनावामुळे दौलता-

१ हास्यविनोदमीमांसा (१९३७) पृ. ७५.

बादच्या वजीर व अमीर मंडळींनी शहाजीविरुद्ध कट करून बेगमेचे मन कलुषित केले व त्यास बाजूस सारले. या प्रसंगी बखरकार म्हणतो ' राजे हुशार जहाले आणि बोलिले त्याचा भाव—

अबला यत्र प्रबला बालो राजा निरक्षरो मंत्रिः ।
न हि न हि तत्र धनाशा जीवित-आशापि दुर्लभा भवति ॥'

बेगमेच्या सर्वाधिकारत्वामुळे राज्याची परिस्थिती किती नाजूक झाली होती त्याचे हे वर्णन मार्मिक आहे. शहाजीराजांनी तुकाबाईशी विजापुरी लग्न केले. तुकाबाईच्या सौंदर्याचे वर्णन पुढीलप्रमाणे—

पूर्णचंद्रमुखी श्यामा बालसूर्यसमप्रभा ।
विशालनेत्ररक्तोष्ठी सा प्रिया लभते सुखम् ॥
दक्षा तुष्टा प्रियालापा पतिचित्तानुगामिनी ।
प्रातचिंताव्ययकरी या सा लक्ष्मीरिवा परा ॥

प्रस्तुत बखरीत काही सुभाषिते मात्र स्वतंत्र म्हणजे कोणत्याही प्रसंगास उद्देशून अशी नाहीत. उदाहरणार्थ, सचिवाचे वागणे कोणत्या प्रकारचे असावे याविषयी बखरलेखक लिहितो—

स किं सखा साधु न शास्ति योऽधिपं
हितान्न यः संश्रुणुते स किं प्रभुः ।
सदानुकूलेषु हि कुर्वते रतीं
नृपेष्वमात्येषु च सर्वसंपदः ॥

त्याचप्रमाणे दान कोणत्या प्रकारचे असते यासंबंधी श्लोक—

श्रोत्रियाय दरिद्राय शीलाचारयुताय च ।
पुराणवेद विदुपे दानं देयं कुटुंबिने ॥

भाऊसाहेबांच्या बखरीत हिंदी भाषेतील सुभाषितांचा (दोहरे) उपयोग केलेला दिसून येतो. दत्ताजी शिंदे यांनी श्रीभागीरथीस गणमुक्तेश्वरी येऊन तीर्थविधी केला व अनुकूल दानधर्म केले. त्या प्रसंगी बखरकर्ता सांगतो—

जलकी शोभा कमल है, दलकी शोभा पील ।
धनकी शोभा धरम है, कुलकी शोभा शील ॥

दत्ताजी शिंदे रणात पडल्याची बातमी समजल्यावर एकीकडे जनकोजी शिंदे घायाळ व दुसरीकडे दुराणीचा भारी पेच अशा अगतिक परिस्थितीत दत्ताजीची स्त्री भागीरथीबाई हिने शोक आवरला, त्याचे सुंदर वर्णन पहा—

मेरे मनमे कछु और । कर्ता के कछु और ॥
उधो माधो कहे । झूटी मनकी दौर ॥

मराठा स्त्रीचे तेजस्वी व्यक्तित्व इतके बोलके इतरत्र कचितच आढळेल. भाऊसाहेब पेशव्यांची शत्रूवर चालून जाण्याची मसलत फसल्यावर इब्राहिमखान गारद्याने जो निश्चय केला तो ' आपले बळे धालावी कास, कोणाची न धरावी आस ' अशा समुचित शब्दांत व्यक्त झाला आहे. या बखरीच्या लेखकाचे दिल्लीत वास्तव्य असल्यामुळे हिंदी भाषेतील सुभाषिते त्यास अवगत होणे साहजिकच होय. त्यांचा उपयोग योग्य प्रसंगी करण्यात त्याचे कौशल्य प्रगट होते. हिंदी दोहऱ्यांचा वापर शेडगावकर बखरीतही प्रसंगविशेषी दिसून येतो. उदाहरणार्थ, विरूबाई व वसवंतराव आपा खोजे ही दोघे शाहू महाराजांच्या सहवासामुळे पवित्र झाली हे खालील सुभाषितांनी पटवून दिले आहे—

लोह झगटता परिसाशी । मग पूर्व स्थिती कैची ॥
आगिये भसर्ग कीया वडोका संग ।
माथा चेडे श्री शांके बाहे जातहे गंग ॥

दुसऱ्या बाजीरावाने कित्येक कुटुंबे धुळीस मिळवून त्यांचा तळतळाट घेतला. हा प्रसंग वर्णिताना लेखक म्हणतो—

बडे लोक गरीबकु मत सताय, बुरी गरीबकी हाय
मरे चामके फूकसे, लोहा भसम हो जाय ॥
हाय करे तो हाय बीजले, परबत बीजले जाय ।
ऐसा पापी जीवडा, इसमो हाय समान ॥

दुष्ट कर्मे करून रावबाजी पदच्युत झाल्याचा यातील ध्वनी काव्यमय नाही काय?

### सुभाषितांचे वैशिष्ट्य

बखरीत सुभाषितांचा उपयोग कमी प्रमाणात असला तरी ज्या ज्या ठिकाणी त्यांचे अस्तित्व आहे त्या त्या ठिकाणी त्यांची समर्पकता जाणविल्याशिवाय राहत नाही. निवेदनाच्या ओघात त्यांची मार्मिकता विशेष खुलून दिसते. बखरींची शैली सुभाषितांमुळे आकर्षक झाली आहे असा प्रत्यय आल्याविना राहत नाही. मूळ प्रसंगांना उठाव देण्यासाठी सुभाषितांची योजना असल्यामुळे त्यांतील भाषेच्या प्राकृतिक अंगाचे सौंदर्य निश्चितच वाढले आहे. सुंदर सुभाषितांच्या पखरणीत बखरलेखकांची बहुश्रुतता व रसिकता ही दिसून येतात. शिवदिग्विजय या बखरीत मात्र सुभाषितांच्या आत्यंतिक वापरामुळे त्यांतील वर्णनाचा ओघ खंडित झालेला आहे; पण भाऊसाहेबांच्या बखरीतील वेचक सुभाषितांमुळे भाषेचा अखंड प्रवाह शेवटपर्यंत टिकला आहे. ही सुभाषिते त्यांतील प्रसंगांशी एकजीव झालेली आढळतात. भाऊसाहेबांच्या बखरीची शैली ही मुळातच साहित्यगुणसंपन्न असल्याने सुभाषिते हा तिचा अविभाज्य गुण म्हणावयास

हरकत नाही. इतर बखरींत सुभाषिते नाहीत याचे कारण त्यांच्या लेखकांची पृथगात्मता ही एकांगी आहे असेच म्हटले पाहिजे. सारांश, सुभाषितांमुळे बखरींच्या वाङ्मयीन गुणांत भरच पडली आहे.

## वाक्संप्रदाय-विशेष प्रकार

वाक्संप्रदाय हा कोणत्याही प्रगत भाषेचा एक विशेष प्रकार होय. एखाद्या शब्दाचा अर्थदृष्टीने विशेष प्रकारचा उपयोग करून बनविलेले वाक्य, वाक्यांश किंवा शब्दसमूह म्हणजे वाक्संप्रदाय. वाक्संप्रदाय हा शब्दसंच सामान्यतः अर्थदृष्ट्या अपूर्ण असतो. संपूर्ण वाक्याचा आधार घेतल्याविना त्याचा अर्थ स्पष्ट होणे कठीण. वाक्संप्रदायांतील शब्द नेहमीच्या प्रचारातील असतात; पण अर्थदृष्टीने त्यांचा वेगळ्या तऱ्हेने उपयोग केलेला असतो. या दृष्टीने पाहता अलंकारिक म्हणजे लाक्षणिक अर्थ हा वाक्संप्रदायांचा विशेष म्हणता येईल. उदाहरणार्थ, पाऊल टाकणे, तोंड सोडणे, डोळ्यांवर कातडे ओढणे इत्यादि. एखाद्या शब्दसंघाच्या विवक्षित अर्थावर लक्ष ठेवून त्यायोगे बोलण्याचा किंवा प्रतिपादण्याचा विशेष रोख प्रत्ययास आणून देण्याचे कार्य वाक्संप्रदायांच्याद्वारे केले जाते. वाक्संप्रदायांचा उद्देश अलंकारिक अर्थप्रतीती हा असल्यामुळे सुशिक्षित लोकांच्या संभाषणात किंवा साहित्यलेखनात त्यांचा उपयोग केलेला आढळतो. अर्थातच भाषणाला वा लेखनाला जोर येण्यासाठी वाक्संप्रदायांचा आधार घेतला जातो.

## वाक्संप्रदायांचे वर्गीकरण

वाक्संप्रदायांच्या वर्गीकरणासंबंधी विविध मते आहेत. त्यांपैकी श्री. कृ. कोल्हटकरांचे मत विचारात घेण्यासारखे आहे. कोल्हटकर म्हणतात "ज्याप्रमाणे धरणीकंपाचा धक्का सपाटीसरसा समुद्राच्या ठिकाणी डोंगर व डोंगराच्या जागी समुद्र निर्माण करितो. त्याप्रमाणे मनाचा आवेगही एका शब्दसमूहाचे ठायी निराळ्या शब्दसमूहाचा अर्थ आणून बसवितो. शांत वृत्तीस ही गोष्ट साध्य नसते. यामुळे जे ग्रंथ लिहिण्यास मनाचा समतोलपणा लागतो, अशा म्हणजे अर्थात शास्त्रीय ग्रंथांत संप्रदायांचे वैपुल्य नसते...... वृत्तींच्या आवेगावर आपणांस संप्रदायांचे वर्गीकरण करिता येण्यासारखे आहे. अर्थात मनोविकाराचे जितके प्रकार, तितके संप्रदायांचे मानण्यास हरकत नाही...... संप्रदायांचे हे जे वर्ग होतात, त्या प्रत्येकाच्या पोटात नामसर्वनामादि प्रकारांइतके पोटवर्ग केले, म्हणजे लेखकास सोइस्कर असे वर्गीकरण होईल.[२]

## बखरींतील वाक्संप्रदाय

मराठी बखरींत प्रामुख्याने वीर व करुण या दोन रसांचीच प्रतीती होते. बखरींचे विषय ऐतिहासिक व्यक्ती वा घटना यांच्या हकीगती हे असल्यामुळे पराक्रम व नाश यांना त्यात अग्रस्थान असणे स्वाभाविक आहे आणि म्हणूनच उत्साह व शोक (खेद) हे त्यांचे स्थायीभाव त्यांत उत्कटत्वाने आस्वाद्य होतात.

**(अ) उत्साह उत्पन्न करणारे संप्रदाय—**

कुतरतोड करणे– तो एवढ्यात सदाशिवपंतांनी कुतरतोड करून......सर्व शत्रूंस......दामटून घातले (पाणिपतची बखर)

गर्दी (स) होणे (नेणे, मिळविणे) – एकच गर्दी होऊन गेली. (पा. ब.)

'यास गर्दीस नेऊन मुलाची स्थापना करावी' (सप्तप्रकरणात्मक चरित्र)

श्री सांबकृपेने इराणीस मारून गर्दीस मिळवून देऊ. (पा. ब.)

गोळी वाजविणे (प्रतिकार करणे)– ज्या गढीवाल्याने गोळी वाजविली. (होळकरांची कैफियत).

चरित्र दाखविणे (इंगा दाखविणे)– बाळाराम शेट याजला काही चरित्र दाखवावे. (हो. कै.)

छातीचा कोट करणे – त्या समयी भाऊसाहेबांनी छातीचा कोट करून. (भाऊसाहेबांची कैफियत)

डोंगरी मोर नाचविणे (आढ्यतेने वागणे) – आज-पावेतो डोंगरी मोर नाचविले. आता अवघड पडले. (हो. कै.)

तरवार पाहणे– ज्या ठिकाणी कामकाज पडले तेथे तरवार तुझीच पाहण्यात आली. (हो. कै.)

प्यादेमात होणे – लक्ष फौजेनिशी भाऊगर्दी होऊन प्यादेमात कशी झाली हे सविस्तर लिहावे (भाऊसाहेबांची बखर)

रणास आणणे (मारणे) – पाच हजार माणूस खानाचे रणास आणिले. (स. च.)

लांडगेतोड होणे–' चोहोकडून तोंडे लागून लांडगेतोड झाली.' (भा. ब.)

एका आंगी येणे (स्वतःच साहसाने पुढे जाणे)–

२ कोल्हटकरांचा लेखसंग्रह (१९३२) पृ.२९४-२९५.

'नीटच पुढे चालले. एका आंगीं आले.' (पा. ब.)

कविले पुरे करणे (कुटुंबाची कत्तल करणे)–'म्हणून कविले पुरे करून आपण केशरी पोशाख करून '(स. च.).

घे घे गर्जना उठणे–'घे घे हीच गर्जना उठली.' पा. ब.)

पाय पसरून मारणे (श्रम न पडता मारणे)–'बाकी कच्छे व राठोड माझ्या बापाने शंभर वेळा पाय पसरून मारले आहेत.' (हो. कै.)

मरून मिठणे (तोंड देऊन मरणे)–'कदाचित तमावर चढून (ईर्ष्येने) आगळीक केल्यास मरून मिटू.' (हो. कै.)

चढे घोडियानिशी (सपाट्यासरसा)–'शिवाजी काय? चढे घोडियानिशी जिवंत कैद करून घेऊन येतो.' (सभासदाची बखर)

**(आ) शोक निर्माण करणारे संप्रदाय—**

अन्नाचे खोबरे होणे (दुर्मिळ होणे)– मनुष्यास अन्नाचे खोबरे जाले. (भा. ब.)

आभाळ पांढरे होणे–'चोहोकडे एकदाच आभाळ पांढरे जाले.' (भा. ब.)

आयुष्याची (आकाशाची) दोरी तुटणे–'तशात एका-एकीच बळवंतराव याचे आयुष्याची दोरी स्वर्गीची तुटली' (भा. ब.)

चिंधीचोळा करणे - 'ऐसा शहरचा चिंधीचोळा केला.' (भा. ब.)

छत्री पळणे (मावळणे)– 'तमाम फौजेची छत्री पळाली' (भा. ब.) फौजेंची छत्री मावळली.' (भा. ब)

तोंडी माती घालणे—धाय मोकलून ऊर माथा बडवून तोंडी माती घालू लागली' (भा. ब.)

पानिपत होणे (नाश होणे)-शेवटी त्यांचे पानपत जहाले. (पेशव्यांची बखर)

पोळजत्रा होणे (दुर्दशा होणे)–मल्हारराव यांचे फौजेची पोळजत्रा जाली' (भा. ब.)

मरणाचे घरी आणणे– 'रावसाहेब! तुम्हांस मी मरणाचे घरी आणिले' (पा. ब.)

वस्त्रहरण करणे– 'ते समयी शहरचे वस्त्रहरण करून किल्यास मोर्चे लाविले.' (भा. ब.)

ससेहोलपट होणे - 'मारा! मारा! असे होऊन ससेहोल-पट होऊन एक ठार जाहाला.' (भा. ब.)

**(इ) भय जागृत करणारे संप्रदाय—**

अनर्थ मांडणे – औरंगजेब येऊन (त्याने) किल्ले-किल्ली अनर्थ मांडिला.' (स. ब.)

'अल्लाका डेरा' दाखविणे– अल्लाका डेरा दिखलाव म्हणोन शिरच्छेद करावा. (भा. ब.)

अस्तनीतच अग्नी असणे—आमचे अस्तनीतच अग्न आणि जाट हस्तगत कसा होतो? (भा. ब.)

करवत घेणे (जलसमाधी घेणे)- कितीएकांनी राज्यलोभे प्रयागी जाऊन करवत घेतले.' (पा. ब.)

गर्दी गुदरणे–त्याचे मुर्द्यावर मोठी गर्दी गुदरली. (पा.ब.)

पोटात हरणाची काळजी शिरणे-'त्यांच्या पोटात हरणाची काळजी शिरून, निशाणे माघारी फिरवून तडक पळो लागले.' (भा. ब.)

पंगतीचा स्वीकार करणे (तशी अवस्था होणे)–इतःपर कोणी गोष्ट बोलिले असता त्या पंगतीचा स्वीकार करावा लागेल.(हो. कै.)

**(ई) प्रेम उत्तेजित करणारे संप्रदाय—**

पगडीबदल भाईचारा करणे (स्नेह होणे)–' पगडी-बदल भाईचारा करून त्यास आज्ञा केली' (हो. कै.)

पगडीभाई होणे–'हिंदुस्थानातील स्वधर्म की, पगडीभाई जाहाल्यावर पोटचे द्यावे पण पाठीचे देऊ नये.' (भा. ब.)

मस्तकी हात ठेवणे–' कृपाळू होऊन एकवेळ मस्तकी हात ठेवावा.' (हो. कै.)

सानकरोटी देणे (आणभाक देणे)–'तरी साहेबी मजला सानकरोटी द्यावी.' (भा. ब.)

**(उ) उपहासनिर्मिती करणारे संप्रदाय**

आठ अक्षरी मंत्राचा जप करणे (कसे करू? काय करू?)–'धनगरा उठ, आठ अक्षरी मंत्राचा जप का करतोस?' (हो. कै.)

इल्लाबिल्ला दाखविणे (चाळविणे)–'ऐवजास इल्लाबिल्ला ,दाखऊन आमचे आपसात कलह उत्पन्न केला.' (हो. कै.)

उकाल निघणे (पोटातील भावगर्भ बाहेर येणे)–तात्या आळेकर याजकडून पैका घ्यावा, असे उकाल निघू लागले.' (हो. कै.)

मुर्गीस बिसमिल्ला (क्षुद्र गोष्टीस मोठी तयारी)–'मुर्गीस बिसमिल्ला तो कशास?' (हो. कै.)

**(ऊ) संकीर्ण संप्रदाय—**

आयत्या पिठावर रेघा ओढणे (धार्मिक)–'आयत्य पिठावर रेघा कोणीही ओढील.' (भा. ब.)

एकमुखी रुद्राक्ष होणे (सत्ता केंद्रित होणे, धार्मिक) –'एकमुखी रुद्राक्ष जाला.' (हो. कै.)

जीवित्वाचा संकल्प सोडणे (धार्मिक)–'जीवित्वाचा संकल्प सोडून............चाल केली.' (पा. व.)

तुळशीपत्र ठेवणे (धार्मिक)–'आम्ही देणे ते तुळशीपत्र ठेवून देऊ' (हो. कै.)

तोंडचे जार वाळणे (अवयव)—शिंदे यांची मुले म्हणजे काय! त्यांचे तोंडचे जार वाळले नाही! (भा. व.)

पाण्याआधी वळण बांधणे (व्यवहार)–पाण्याआधी वळण बांधिता उत्तम.' (भा. व.)

वेल मांडवास जाणे (दौलत वाढणे) (वनस्पतिशास्त्र) – 'अशाने वेल मांडवास कसे जातील? (हो. कै.)

**वाक्संप्रदायांचे ' महत्त्व**

वाङ्मयगुणसंपन्न अशा बखरींत वाक्संप्रदायांचा उपयोग प्रकर्षाने केलेला आढळतो. या संप्रदायांनी वाक्यांना आटोपशीरपणा येऊन अर्थव्यक्ती परिणामकारक झालेली दिसते. त्यांतील वेचक व चपखल शब्दांमुळे वाक्यांचा तोल राहून ती चटकदार झालेली आहेत व क्लिष्टत्वाच्या अभावी भाषाही सुबोध झाली आहे. हे संप्रदाय बखरींतील वाक्यांशी एकजीव झाल्याने त्यांत सहजता हा गुण आपोआप निर्माण झाल्यास नवल नाही. बखरगद्यातील ओज व प्रसाद हे बहुतांशी संप्रदायाचेच पर्यवसान म्हणता येईल. बखरींतील मराठमोळेपणाचे श्रेय या वाक्संप्रदायांकडेच जाते. शिवाय तत्कालीन चालीरीती, लोकव्यवहार, धार्मिक समजुती इत्यादिकांची कल्पना त्यांच्यामुळे येते हे निराळेच. अभिव्यक्तीच्या परिणामकारकतेसाठी संप्रदायांचा उपयोग केल्यामुळे बखरींची एक रम्य शैली निर्माण झाली आहे हेच खरे.

**म्हणी — दुसरा प्रकार**

वाक्संप्रदायांप्रमाणेच भाषेचा दुसरा विशेष प्रकार म्हणजे म्हणी. एखादी म्हण म्हणजे सर्व-सामान्य झालेल्या वैशिष्ट्यपूर्ण अर्थाचे संपूर्ण वाक्य. म्हणी व संप्रदाय यांतील साम्य म्हणजे त्यांचा विशेष अर्थ. केवळ रचनेच्या दृष्टीने पाहिले तर ही दोन्ही एकच. भेद एवढाच की, म्हण स्वतंत्र निर्मितिक्षम असून संप्रदाय तसा नसतो. व्याकरणकार रा. भि. जोशी यांच्या मते Motto व Idiom यांतील जो भेद तोच म्हणी व वाक्संप्रदाय यांतील मानावा.[3] म्हणीत एखादा परिचित अनुभव तात्पर्यरूपात साठविलेला असतो.

विशिष्ट प्रसंगी त्या अनुभवाची आठवण करून आपले म्हणणे पटवून देण्यासाठी म्हणींची योजना केलेली असते. म्हणींत उपदेशाची सूचना ध्वनित असते. त्यांतील सत्य हे सार्वकालीन व सर्वमान्य असल्यामुळे त्यांचा उपयोग एखाद्या दृष्टांतासारखा होतो व प्रस्तुताचे प्रतिपादन समर्पक रीतीने होते. क्वचित प्रतिपक्षास निरुत्तर करण्यासाठीही त्यांचा उपयोग होतो.

म्हणींचा संबंध हा लोकव्यवहाराशी विशेष असतो. त्यांची रचना मुद्दाम केलेली दिसत नसली तरी व्यवस्थित शब्दरचनेमुळे त्यांतील चातुर्य मात्र व्यक्त होते. म्हणींची शब्दरचना फिरविता येत नाही हे त्यांचे वैशिष्ट्य होय. त्यांच्या उपयोगाला परंपरेचे अधिष्ठान असते. त्यांचे स्वरूप संक्षिप्त असून जुनी माणसे, बायका व अशिक्षित पण अनुभवी लोक यांच्या तोंडी त्या असतात. गद्यवाङ्मयाचा विकास होऊ लागल्यामुळे म्हणीसारखी लघुवचने आता मागे पडत आहेत. म्हणीतील ठराविक ठशांची वाक्ये आनंदनिर्मिती करू शकत नाहीत. त्या अंधपरंपरेच्या निदर्शक म्हणून मानण्याची सुशिक्षितांची प्रवृत्ती असते. संप्रदायांत जे बुद्धिचातुर्य असते ते म्हणींत नसल्याने म्हणींपेक्षा संप्रदायांचा अधिक उपयोग करण्याकडे कल दिसतो. ज्ञानप्रसारामुळे म्हणींत खोटी विधाने असण्याचा जसा धोका आहे तसा प्रकार संप्रदायांचा नाही. म्हणींच्या या स्वाभाविक मर्यादा लक्षात घेऊनही शास्त्रीय ग्रंथांतील सूत्रांप्रमाणे अल्पाक्षरात अर्थव्यक्ती करण्याचे त्यांचे सामर्थ्य मान्य केलेच पाहिजे.

**म्हणींचे वर्गीकरण**

बखरींतील म्हणींचे विधानरूप व विधिरूप असे एक साधारण वर्गीकरण करता येईल व त्यातही प्रत्येकी अनुप्रासात्मक, रूपविस्तारात्मक, विरोधाभासात्मक व दृष्टांतात्मक असे पोटभेद कल्पिता येतील.

**विधानरूप म्हणी :**

(अ) अनुप्रासात्मक —–चार चोरांचे चार होरांचे. (हो. कै.)

जैशी दैवाची उजरी तैशी बुद्धी उपजे शरीरी. (भा.ब.)

३ मराठी भाषेची घटना (१९२३) पृ. १५८.

दे माय धरणी ठाय. (भा.ब.)
हिंमत मर्दा मदत खुदा. (भा.ब.)
(आ) रूपविस्तारात्मक--एक पंथ दो काज. (भा.ब.)
गर्वाचे घर खाली. (भा.ब.)
(इ) विरोधाभासात्मक--जोर थोडा आणि गुस्सा बडा. (भा.ब.)
मरणाहून अपेश वोखटे.(भा.ब.)
बाळकाचे चोरीस बुक्क्यांचा मार.(हो.कै.)
सभाग्य साधून जाय निधी आणि अभाग्य मागे मृत्तिका शोधी. (भा.ब.)
सोम्या मारी गोम्याला, प्रायश्चित्त राजघराला.(हो.कै.)
(ई) दृष्टान्तात्मक — अजगरका दाता राम.(भा.ब.)
एकीकडून आड व एकीकडून विहीर. (भा.ब.)
जात्यातील रडती आणि सुपातील हासती.(भा.ब.)
मुरगी मारी बचडे दाणादाण.(भा.ब.)

**विधिरूप म्हणीः—**

(अ) अनुप्रासात्मक—आपले बळे घालावी कास, कोणाची न धरावी आस.(भा.ब.)
जैसी क्रिया धरावी तैसे फळ पावावे. (भा. ब.)
लेजे दे दान लेजे दे प्राण. (भा. ब.)
(आ) विरोधाभासात्मक-नकटे असावे परंतु धाकटे असो नये. (भा. ब.)
पोटचे द्यावे पण पाठीचे देऊ नये. (भा. ब.)
लाख मरावे परंतु लाखाचा पाळणारा कायम राहावा. (शेडगावकर बखर)

उपरिनिर्दिष्ट वर्गीकरणावरुन असे दिसून येईल की, अनुप्रासात्मक म्हणींचा चटकदारपणा त्यांतील कर्णमधुरत्वात आहे. रूपविस्तारात्मक म्हणींचा आकर्षकपणा त्यांतील अर्थविस्तारात आहे. विरोधाभासात्मक म्हणींची चमत्कृती त्यांतील दोन्ही अवयवांच्या विसंगतीत व दृष्टांतरूप म्हणींचा चित्तवेधकपणा त्यांतील चित्रगुणांत आहे. शिवाय असेही म्हणता येईल की, पहिला वर्ग कर्णमधुर, दुसरा व तिसरा वर्ग बुद्धिगम्य व शेवटचा वर्ग कल्पनागम्य होय.

बखरींतील म्हणींचा आणखी एक लक्षणीय प्रकार म्हणजे सुभाषितात्मक म्हणी. यांत संस्कृतभाषेतील लहान लहान चटकदार सुभाषितांना म्हणींचे स्वरूप प्राप्त झालेले असते. उदाहरणार्थ, 'इदं च नास्ति परं न लभ्यते' (भा. ब.), 'कर्मणो गहना गतिः' (भा. ब.), 'न भूतो न भविष्यति' (भा. ब.). 'विनाशकाले विपरीत बुद्धिः' (भा. ब.) 'स्त्रीबुद्धिः प्रलयं गता' (भा. ब.) इत्यादि.

**म्हणींची योग्यता**

बखरींतील चित्ताकर्षक म्हणींमुळे विषयप्रतिपादन प्रभावी झाल्याचे स्पष्ट दिसते. विशिष्ट प्रसंगांना उद्देशून असलेल्या म्हणींमुळे ते प्रसंग हृद्य होऊन मनावर ठसतात. वाक्संप्रदायांप्रमाणे म्हणींची मूळ आशयाशी एकरूपता व त्यातील मनाचा आवेग यामुळे बखरीत अर्थसौंदर्याची भर पडली आहे. लोकभाषेतील म्हणींना बखरींतील ग्रांथिक भाषेत एक विशिष्ट स्थान प्राप्त झाले आहे.

**बखरींचे पैलू**

बखरसाहित्यातील सुभाषिते, वाक्संप्रदाय व म्हणी यांचे वैशिष्ट्य या प्रकारचे आहे. बखरलेखकांच्या भावना व विचार यांचे यथार्थ निवेदन करण्याचे कार्य त्यांनी यशस्वीपणे केले, म्हणूनच बखरींना वाङ्मयीन महत्त्व प्राप्त होण्याचे हे एक कारण होय. बखरींतील सुभाषितांमुळे वैचारिक उदात्ततेची पातळी उंचावली तर वाक्संप्रदाय व म्हणींमुळे माधुर्यगुणाची संपन्नता आली. बखरींचे हे तेजस्वी पैलू होत. त्यांच्यामुळे बखरकारांच्या मोहक व्यक्तित्वाचे आगळे दर्शन होते यात सुतराम् संदेह नाही.

---

भारत इतिहास संशोधक मंडळाच्या ५० व्या वार्षिक संमेलनात वाचलेला निबंध.

अनुक्रमणिका

# डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या — काही विचार

भीमराव कुळकर्णी

डॉ. केतकरांचे चरित्र, त्यांच्या कादंबऱ्या व त्यांच्याबद्दलचे बरेचसे वाङ्मय वाचून केतकरांबद्दल उलट-सुलट मतांची वावटळे मनात घर करून राहतात. केतकरांचे विक्षिप्त आचार-विचार, खाण्यापिण्यातील स्वैरता, अनियमित वागणे यांच्याबरोबरच त्यांची गाढ विद्वत्ता व व्यासंगशीलता यांचा मेळ न घालता आल्यामुळे क्षणभर भांबावल्यासारखे होते. त्यातच त्यांच्या कादंबऱ्यांची सैल रचना व आशयामधली धक्कातिशयता यांमुळे काही ठराविक निष्कर्ष काढले जातात. त्यांच्या कादंबऱ्यांतील विचारसरणीमधून केतकर हे अत्याधुनिक अशा नव्या समाजरचनेचे पुरस्कर्ते होते, असे सांगण्यात येते, आणि त्यांच्या लेखनस्वरूपावरून त्यांनी कादंबरीलेखनाचा कलात्मकदृष्ट्या विचार केला नव्हता, असा निष्कर्ष काढण्यात येतो. त्यांची विवाहविषयक मते अतिशय क्रांतिकारक व वादळे उठविणारी अशा प्रकारची, तर टीकाकारांच्या फेकी निर्भयतेने व बेडरतेने झेलणारे असेही त्यांचे एक चित्र रेखाटण्यात येते. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या काळजीपूर्वक अभ्यासिल्या असता त्यांच्या कादंबरीलेखनाला काही महत्त्वाचे तंत्र आहे व त्यातील आशयाचा विचार करताना केतकरांचे एक निराळेच व्यक्तिमत्त्व आपल्या मनात साकार होते असे मला वाटते.

ज्ञानकोशाच्या कार्याला प्रत्यक्ष सुरुवात करण्यापूर्वी १९१६ साली त्यांना थोडा अवधी लाभला म्हणून त्यांनी कादंबरी लिहिण्यास सुरुवात केली. मराठीतील तत्कालीन कादंबऱ्यांचे अवलोकन केल्यानंतर त्यावरील इंग्रजी वाङ्मयाचा जबरदस्त पगडा त्यांच्या लक्षात आला व त्यामुळे त्यांना येत असलेला साचेबंदपणा, ठरीव घाट, तंत्राचा बडेजाव झाल्यामुळे आशयावर होत असलेला अन्याय त्यांच्या लक्षात येऊ लागला. अमेरिकेतल्या चार-पाच वर्षांच्या वास्तव्यामुळे अमेरिकन कादंबरी ही इंग्रजी (ब्रिटिश) कादंबरीपेक्षा कितीतरी बाबतीत अधिक मोकळी व स्वाभाविक पद्धतीने लिहिलेली असते, त्याप्रमाणे आपण कादंबऱ्या लिहाव्यात ही एक प्रेरणा होती. अमेरिकन पद्धतीमध्ये तंत्राचा फार मोठा बाऊ नव्हता आणि यामुळेच स्वतंत्र दृष्टिकोनातून व अधिक व्यापक भूमिकेवरून आपण कादंबऱ्या लिहू शकू अशी त्यांना खात्री वाटली, म्हणून तत्कालीन कादंबरीकारांचा काहीसा उपहास करूनच ते कादंबरी लिहावयास बसले. इंग्रजी वाङ्मयाभ्यासाने आपल्याकडे कादंबरीलेखनामध्ये जशी तंत्रातिशयता आली होती, तसेच आशयामध्ये कादंबरीकारांनी आगरकरप्रणीत विवेकनिष्ठ ध्येयवाद आणला होता. अठरापगड जातींतून निर्माण झालेल्या अमेरिकन समाजामध्ये वावरल्यामुळे व्यवहारी चष्म्याशी गाठ पडलेल्या केतकरांना सुरुवातीला बारीकसारीक गोष्टींतील आपली ध्येयनिष्ठ व त्यागवादी परंपरा बरीच दुबळी वाटू लागली, म्हणूनच हरिभाऊंच्या गणपतरावांना ' गद्धे गणपतराव ' व हरिभाऊंच्या कादंबरीमय जगास ' सदाशिवपेठी ' हे खास बिरुद लावून त्यांनी कादंबरीलेखनाच्या क्षेत्रात उडी घेतली.

१९१६ मध्येच ' गोंडवनातील प्रियंवदा ' या कादंबरीची एका झपाट्यात त्यांनी वीस प्रकरणे लिहून काढली व ज्ञानकोशाच्या कार्यास प्रत्यक्ष सुरुवात झाल्यामुळे १९२६ पर्यंत ही प्रकरणे तशीच पडून राहिली. १९२४ मध्ये ज्ञानकोशमंडळाला पूरक म्हणून त्यांनी ' विद्यासेवक ' हे मासिक काढले आणि १९२६ मध्ये त्यांनी पूर्वी १९१६ साली लिहिलेली कादंबरीची वीस प्रकरणे पुन्हा बाहेर काढली व त्यांतील सोळा प्रकरणे ठेवून आणखी सात प्रकरणे जोडून ' विद्यासेवका'त प्रकरणशः व निनावी प्रसिद्ध केली. ही कादंबरी काळजीपूर्वक वाचली असता पहिल्या सोळा प्रकरणांतून कादंबरीचा सगळा महत्त्वाचा कथाभाग आलेला आहे, व नंतरची सात प्रकरणे म्हणजे निव्वळ कादंबरी ' आलबेल ' करण्यासाठी रचलेली वाटतात.

या पहिल्या कादंबरीनेच केतकरांचे कादंबरीलेखनतंत्र स्पष्ट झाले. सबंध कादंबरीचे कथानक ज्या कालखंडात घडलेले दाखविलेले आहे, त्या कालखंडाशी (१८८०-९०) या कादंबरीतील एकंदर घटना विपर्यस्त आहेत, आणि त्याची काही जाणीवही केतकरांना होती हे पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेल्या कादंबरीतील प्रस्तावनेवरून दिसून येते.

' गोंडवनातील प्रियंवदे'ला स्वयंपूर्ण, एकसंध कथानक नाही. कथा, चर्चा, व्याख्यानबाजी इत्यादि अनेक स्वरूपांत तिच्यातील काही व्यक्ती बळेच एकमेकांशेजारी

आणण्यात येतात, त्यामुळे कादंबरीच्या सैल संविधानकावर ज्या वेळी टीका होऊ लागली, त्या वेळी पुढे लगेच सहा महिन्यांनी त्यांनी जी 'परागंदा किंवा भारतीय समाजाची सरहद्द' ही कादंबरी प्रसिद्ध केली, त्याच्या प्रस्तावनेत त्यांना आपल्या नवीन कादंबरी-लेखनाचे तंत्र सांगावे लागले. सुरुवातीलाच त्यांनी स्पष्ट सांगून टाकले आहे की, 'पुष्कळ अवलोकन झाले आहे अशा प्रत्येक व्यक्तीच्या मनात हजारो विचार येतात आणि ते बहुधा मनातल्या मनातच राहतात, आणि छापखानदाराने म्हणजे त्याच्या पाठीमागे असलेल्या खिळे जुळणीच्या ठेकेदाराने नेट लावला म्हणजेच ते विचार कागदावर उठतात; तर ग्रंथ-रचनेचे श्रेय त्यास द्यावयास काय हरकत आहे ?'

केतकरांच्या या निवेदनात उपहासगर्भता असली तरी अवलोकनातून निर्माण झालेल्या विचारमंथनाच्या निवडीचे त्यांना महत्त्व वाटत नाही, हे दिसून येईल. पुढच्या परिच्छेदामध्ये त्यांनी लिहिले आहे, 'लेखक लिहू लागला म्हणजे त्यास परिचित अशा विषयाची स्मृती जागृत होऊन अनेक देखावे दिसू लागतात आणि ते स्वाभाविक-पणे कथानकात उतरतात. जगात जे व्यक्तींचे संबंध लेखक पाहतो ते या संबंध कथानकाचे अंश होत. त्यांची एकमेकांशी जुळणी झाली म्हणजे कथानक तयार होते, या साऱ्या नियमाने प्रस्तुत गोष्ट तयार झाली आहे. एखाद्या ग्रामाचा किंवा मनुष्यसमूहाचा आयुष्यक्रम सांगणाऱ्या युरोपीय वाङ्मयात ज्या कादंबऱ्या आहेत, त्यांमध्ये कथा-नकाची गुंतागुंत बरीच कंटाळणवाणी असते. एक मोठा वृक्ष व त्याची अनेक बांडगुळे व त्यांस वेष्टिणाऱ्या पण एकमेकांत गुंतलेल्या अशा अनेक वेली, अशा वनस्पतिसमुच्चयाशी त्या कादंबऱ्या तुल्य नसून एकमेकांशी ज्यांच्या फांद्या अडकल्या आहेत अशा स्वतंत्र बुंध्याच्या वृक्षराजीशी त्या तुल्य असतात. या प्रकारच्या कादंबऱ्यांशी ज्यांस परिचय नाही त्यांस 'प्रियंवदा' ही कादंबरी 'शास्त्रीय नियमांनी तयार झाली नाही' असे वाटले.'

डॉ. केतकरांना 'प्रियंवदा' ही कादंबरी 'शास्त्रीय नियमांनी तयार झाली आहे असे वाटते. हा शास्त्रीय नियम म्हणजे अमेरिकन कादंबरी लेखन मंत्राचा-होय. इंग्रजी कादंबऱ्या वाचणाऱ्यांना अमेरिकन कादंबऱ्या वाचताना भाषेचा जो ओढताळपणा वाटतो, तसाच प्रकार मराठी वाचकांना केतकरांच्या कादंबऱ्या वाचताना वाटतो. कारण भाषेच्या बाबतीतहि लेखनरूढी पाळावयाच्या नाहीत असे त्यांचे धोरण दिसून येते. त्यामुळे परागंदा कादंबरीवर 'मोडकी तोडकी व रुक्ष भाषाशैली' म्हणून चारी बाजूंनी टीका होऊ लागलेली पाहून त्यांनी आपल्या भाषाशैलीचेही समर्थन करण्याचा प्रयत्न केलेला आहे. 'विद्यासेवका'त त्यांनी लिहिले आहे, 'कादंबरी पुनःपुन्हा त्या दृष्टीने वाचूनही भाषाविषयक दोष आढळून येत नाहीत. परागंदा झालेल्या व्यक्तींच्या मराठी भाषेत जे दोष उत्पन्न होतात ते फारच पुष्कळ वाचकांत अरुची उत्पन्न करतात.'

आपल्या कादंबऱ्यांच्या नवीन तंत्राबद्दलचे व त्यांतील भाषेबद्दलचे अज्ञान त्यांनी टीकाकारांच्या गळ्यात बांधल्या-नंतर पुन्हा 'परागंदे'च्या उपसंहारात त्यांनी, 'कादंबरीकाराचे कथनस्वातंत्र्य खरोखर अमर्यादित असता, कृत्रिम संविधानकाचे घोंगडे गळ्यात अडकावून घेऊन कादंबरीकार ते स्वातंत्र्य विनाकारण गमावून बसतो' अशी तक्रार करून प्रत्येक कथेस नायक-नायिका असणे वगैरे तंत्रबद्धते-चा पुन्हा एकदा उपहास केलेला आहे.

डॉ. केतकरांनी अशा रीतीने आधुनिकतेची नवी वाट धरलेली असली तरी 'प्रियंवदा' या पहिल्याच कादंबरीत त्यांच्या स्वभावातील काही प्रवृत्तींनी त्यांच्या आधुनिकतेवर मात केली आहे. 'प्रियंवदे'च्या रचनेमध्ये हरिभाऊंच्या कादंबरीलेखनाची फार मोठी छाप आहे. अगदी वाचकांना उद्देशून बोलण्यापर्यंतची ही छाप स्पष्ट दिसते. दुसरी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे कादंबरीच्या पानापानांतून लेखक समाजसुधारकांचा आपल्या समाज-शास्त्रीय ज्ञानाच्या आधारावर जे आघात करतो, त्यातून त्याची पक्की सनातनी वृत्ती स्पष्ट होते. जुन्या परंपरा, जुने रीतिरिवाज, धार्मिक श्रद्धा यांवरच लेखकाचा पिंड पोसला आहे, याची जाणीव होते. जुन्या आचार-विचारांचे समर्थन करून सुधारकी इंग्रजी चाळ्यांची टर उडविणे हा लेखकाचा हेतू उघडउघड दिसून येतो. वेदांमध्ये, आपल्या जुन्या समाजरचनेमध्ये सर्व काही आहे, असे म्हणणाऱ्या एखाद्या सोवळ्या शास्त्र्याचाच हा आधुनिक अवतार आहे. डॉ. केतकर हे मनाने विष्णुशास्त्री, टिळक, राजवाडे यांच्या मालिकेतील आहेत, यात संशय नाही.

समाजाच्या अवलोकनाने प्रतीत होणारे व स्वतःच्या मनात प्रसंगोपात निर्माण होणारे विचार काहीही आडपडदा न ठेवता मांडले पाहिजेत व समाजातील प्रत्यक्षातल्या व्यक्ती वा प्रसंग यांचा कादंबरी-लेखकाने

हवा तसा उपयोग करून घ्यावा, हे त्यांचे धोरण दिसते. कातडी बचावण्याचे धोरण स्वीकारून त्यावर पांघरूण घालणे त्यांस पसंत नव्हते. कादंबऱ्यांतील तत्कालीन व्यक्तिविषयक वर्णने व जातीविषयक निवेदने यांनीच मोठी खळबळ उडवून दिली व मोठे वैचित्र्य निर्माण केले. या आपल्या प्रकाराविषयी त्यांनी 'गावसासू' या कादंबरीत खालील भूमिका व्यक्त केली आहे.

'खऱ्या व्यक्ती व कथेतील पात्रे यांत सादृश्य असते हे मात्र खरे; पण ते टाळता येण्याजोगे नाही. कथालेखक वा वाचक एकाच जगात व काळात असले म्हणजे असा प्रकार व्हावयाचाच...

'कथालेखकाने अत्यंत परिचित व्यक्ती घ्याव्यात, कारण त्याखेरीज कथा समजणार नाही. पण नियम घालता येणार नाही...

'लेखकास अनेक व्यक्तींची टवाळी करावयाची असते, किंवा इज्जत घ्यावयाची असते, त्यामुळे कायद्याच्या कचाट्यात न सापडण्याच्या धोरणाने 'टोपी बरोबर बसेल' इतकी सत्यता येऊ नये याची खबरदारी लेखकास घ्यावीच लागते, परंतु आपल्याकडे या विषयासंबंधी अद्याप चांगला विचार झाला नाही.

'जर प्रत्यक्षावर पात्ररचना झाली नसली, तर त्या पात्राला असत्यता उत्पन्न होते, तर यासाठी प्रत्यक्षावरच पात्ररचना केली पाहिजे. व्यक्तीला बरोबर लागेल असे वर्णन देण्याच्या निषेधाच्या पाठीमागे साहित्यशास्त्रीय तत्त्व नसून कातडी बचावण्याचे तत्त्व आहे—'

राजवाडे यांच्या मृत्यूनंतर 'विद्यासेवका'त लिहिलेल्या लेखात त्यांनी सरदार मेहेंदळे, दत्तोपंत पोतदार, नरसोपंत केळकर यांच्या-बद्दलची राजवाड्यांची परखड मते जाहीर केली, त्या वेळी 'ज्ञानप्रकाश'ने ज्या वेळी राजवाड्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या तोंडचे शब्द सांगण्यात शहाणपणा नसून फटकळ-पणा आहे, अशी टीका केली, त्या वेळीही जिवंत व्यक्ती-वर त्यांना आपल्यावरील आरोपाचे निराकरण मृत्यूनंतर करता येत नसल्यामुळे तसे करणे चुकीचे नाही, असे आपले मत त्यांनी व्यक्त केले.

स्वतःच्या कादंबरीलेखनासंबंधी अशा काही ठाम भूमिका घेणाऱ्या केतकरांनी सुरुवातीला टीकाकाराला अज्ञानात काढले व इंग्लंड किंवा महाराष्ट्रात अद्याप खऱ्या टीकाकारांचा खरा वर्ग निर्माण झाला नाही, आपण ह्या सर्व टीकाकारांना उत्तरे देण्यासाठी नवीन ग्रंथ लिहिणार आहोत व 'मी जे काही लिहिले आहे त्याची उत्तम प्रकारे जाणीव होण्याइतका ज्ञानविकास भोवतालच्या जनतेत नाही, त्यामुळे लोकांच्या स्तुतिनिंदेचीही मला फारशी फिकीर वाटत नाही' अशी जरी घोषणा केली तरी टीकाकारांच्या टीका बेडरपणे झेलण्याइतके त्यांचे व्यक्तिमत्त्व निडर नव्हते.

जुन्या सांस्कृतिक मूल्यांबद्दल सुप्त आदर, काही सन-सनाटी विचार मुद्दाम सोडून समाजात खळबळ उडविण्यात गंमत मानण्याची वृत्ती हा जसा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा महत्त्वाचा विशेष होता, त्याचप्रमाणे ते स्वभावाने अतिशय हळवे होते. 'आशावादी' या कादंबरीच्या प्रस्तावनेमध्ये त्यांच्या या वृत्तीचे प्रतिबिंब उमटले आहे. ज्ञानकोशाचे कार्य संपुष्टात येत चालले, त्या वेळी १९२७ च्या फेब्रुवारी महिन्यात त्यांना एक पिसाळलेला कुत्रा चावला. त्यामुळे कोश पुरा होताच प्रत्येक कोशकार मृत्यू पावतो, असा दैवाचा नियम असावा या विचाराने ते अतिशय हळवे झाले. गीर्वाण लघुकोशकार ओक, एल्. आर्. वैद्य, आपटे, रानडे यांचीही हीच गत झाली असे विचार मनात येऊ लागून त्यांना फेब्रुवारीपासून जूनपर्यंत कादंबरी पुढे रेटवेना. प्रियंवदा, परागंदा, आशावादी यांतील तत्कालीन समाजाचे चित्रण, जिवंत व्यक्तिवर्णने, मुद्दाम खळबळ उडवून देण्यासाठी केलेली भयंकर विधाने व काही विशिष्ट जातींबद्दल अनुदार उद्गार यांमुळे त्यांच्याविरुद्धचे असे एक वातावरण तयार होऊ लागले. संविधानकाचे शिथिलत्वव ओबडधोबड भाषाशैली यांच्याबद्दलच्या सतत टीकेने त्यांना पारंपरिक तंत्रपाटवाची मनोवेधक कादंबरी लिहावी असे वाटू लागले व तसा प्रयत्न त्यांनी 'ब्राह्मणकन्ये'च्या रूपाने केला. 'ब्राह्मणकन्या' या कादंबरीचे कथानक एकसंध व प्रवाही आहे. सुरुवात मोठी आकर्षक आहे व पार्श्व-निवेदन पद्धतीचाही (Flash Back) उपयोग करून घेण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु हा प्रयत्न मर्यादित आहे. कादंबरी जसजशी पुढे जाऊ लागते, तसे लेखकाचे अवधान सुटते व काहीही कोठेही सांगावयाचे ह्या जुन्या नियमाची उजळणी सुरू होते व सुधारकांचा उपहासस्तोत्र चालू झाल्यानंतर ती प्रियंवदेच्या वळणावर जाते.

कादंबरीतंत्राबाबतीत केतकरांमध्ये जसा बदल घडून येत होता, त्याप्रमाणे व्यक्तिविषयक व समाजविषयक वर्णने जपून करावीत, अशीही एक सावधानता त्यांच्यामध्ये निर्माण होत असल्याचे दिसून येते. 'ब्राह्मणकन्या' लिहिली जात होती, त्या वेळी मुंबईच्या विविधवृत्तातून

'गोंडवनातील गावगुंड' ही कादंबरी लिहिली जाऊन त्यांना शेणवी-सारस्वतांबद्दल जे लिहिले होते, त्याचा सूड म्हणून त्यांची सडकून वैयक्तिक निंदा या कादंबरीतून येऊ लागलेली पाहून त्यांचा कादंबरी लेखनाचा जोम बराच ओसरलेला दिसून येतो. त्या वेळी त्यांनी लिहिलेली 'गावसासू' ही कादंबरी सर्वांत छोटी, आटोपशीर व त्यात एखाद दुसऱ्या महाराष्ट्रीय पात्राचा उल्लेख असला तरी या कादंबरीत त्यांनी कोणत्याही मराठी जातिविषयक प्रश्नांचा ऊहापोह करण्याचे टाळले आहे व सुरुवातीसच लिहिले आहे:

'जरी या कथेतील प्रत्येक सामाजिक विधान दृश्य-सृष्टीतील आहे, तरी कोणाही व्यक्तीला उद्देशून या कादंबरी-तील पात्र नाही. प्रस्तुत गोष्ट फक्त या कादंबरीसंबंधानेच आहे असे नाही तर माझ्या सर्वच कादंबऱ्यांसंबंधाने आहे. कादंबरीतील पात्रे म्हणजे विशिष्ट व्यक्ती असे कोणत्याही कादंबरीतील कोणत्याही पात्रासंबंधाने म्हणता येणार नाही.'

टीकाकारांच्या मर्मभेदामुळे हळव्या केतकरांनी गावसासू-नंतर विशेष महत्त्वाचे कार्य हाती नसताही सात वर्षे आपल्या कादंबरी-लेखनाला पायबंद घातला व त्यानंतर आपल्या लेखनतंत्राला वा विवेचनपद्धतीला कसलीही मुरड न घालता 'विचक्षणा' ही कादंबरी लिहिली व जुने काही समाजनिरीक्षणात्मक लेख एकत्रित करून आपल्या भटक्या जीवनातील काही अनुभवांची मोट 'भटक्या' या कादंबरी रूपाने बांधावयाची तयारी चालू असताना त्यांना मृत्यू आला.

त्यांच्या सातही कादंबऱ्यांचा विषय म्हणजे 'विवाह' हा होय. विवाहासंबंधीची नाना प्रकारची चर्चा करण्या-साठी निरनिराळ्या वैवाहिक जीवनावस्थेतील पात्रे त्यांनी निवडली आहेत. विवाहाचा लैंगिक प्रश्नांशी संबंध असल्यामुळे व समाजशास्त्रज्ञाच्या भूमिकेवरून उघड पद्धतीने चर्चिण्याचे धारिष्ट्य केतकरांत असल्यामुळे त्यांच्या कादंबऱ्यांमध्ये विविधता, आकर्षकता सनसनाटी व सामान्य वाचकांना वाटावी अशी काही ठिकाणी अश्लीलताही आली.

प्रियंवदा आणि परागंदा या सुरुवातीच्या कादंबऱ्यांतून त्यांनी स्त्रीपुरुषांच्या तीन जोड्या घेऊन त्यांतील एक विवाहित व दुसऱ्या दोन जोड्यांचे विवाह कथाप्रसंगास कारणीभूत झालेले दाखविले आहेत. या दोन्ही कादंबऱ्या-तील विवाहित जोडप्यांबद्दल केतकरांच्या मनात अतिशय आदर आहे. प्रियंवदा ही सुशिक्षित असूनही सनातनी वृत्तीची तर परागंदामध्ये गदर चळवळीसाठी अमेरिकेत गेलेला गंगाधर अमेरिकेत राहूनही नीतिमान व सोवळा दाखवला आहे. धार्मिक व नीतिमान वैवाहिक जीवनाबद्दल त्यांच्या मनात जसा आदर आहे, त्याप्रमाणेच संस्कृत वाङ्मयांतर्गत नमुन्याचे शृंगारप्रसंग वर्णिताना त्यांच्या लेखणीला सहजता येते त्यांच्या नायिकांची नावे मोठी आकर्षक व संस्कृत वाङ्मयातील मुद्दाम निवडलेली दिसून येतात.

केतकरांच्या बाकीच्या कादंबऱ्यांतूनही अविवाहित परंतु जातिभेद, कडुसंतति व सुधारणेचा काल यापुढे स्वतःच्या विवाहाच्या प्रश्नाच्या बाबतीत काही समस्या निर्माण झालेल्या असाधारण व्यक्ती यांच्या आधाराने विवाहाच्या निरनिराळ्या समस्यात्मक प्रश्नांची विस्ताराने चर्चा केली आहे. त्यामुळे त्यांच्या बहुतेक कादंबऱ्यांचे स्वरूप हे निष्कर्षात्मक होते. अगोदरच्या कथाविषयातून पात्रे ज्या गोष्टीची चर्चा करतात त्यांचेच निष्कर्ष कादंबरीच्या शेवटी प्रबंधरूपाने मांडले जातात. ब्राह्मणकन्या, विचक्षणा यांतील अशा प्रकारचे प्रबंधात्मक निष्कर्ष अनावश्यक आहेत तर बाकीच्या कादंबऱ्यांतील प्रत्यक्ष विवाह होण्यामागच्या भूमिकेमध्ये कशा प्रकारच्या स्वार्थी भूमिका असतात व कोणत्या व्यावहारिक भूमिका असल्या पाहिजेत हे सांगितले जाते. अर्थात इंग्लंड–अमेरिकेतील भारतीय समाजाचे वैवाहिक प्रश्न, वेश्यासंतती, कडुविवाह संबंधापासून निर्माण झालेली संतती, नपुंसकांना संतती प्राप्त करून देण्याचे बुवाबाजीचे सामाजिक महत्त्व इत्यादी व्यापक प्रश्नांभोवती प्रत्यक्ष अवलोकनाधारे जीवनचित्रण केलेले असल्यामुळे ते कृत्रिम न होता शृंगारिक परंतु वास्तव व अतिशय चमत्कृतिपूर्ण झाले आहे यात शंका नाही.

अर्थात त्यातल्या बऱ्याचशा निष्कर्षांवर केतकरांच्या उतावळ्या स्वभावाची छाप आहे. वैवाहिक समस्या चुटकीसरशी सुटाव्या अशीही त्यांची एक मनोभूमिका सगळीकडे व्यक्त होते. आणि या भूमिकेनुसार ते वैवाहिक प्रश्न चुटकीसरशी सोडविताना दिसतात. समाजाच्या निरनिराळ्या विवाहविषयक व्यवहारांमध्ये अर्थशास्त्रीय व परिस्थितीपुढे हतबल होण्याची व आहे ती स्वीकारण्याची वृत्ती यांचे प्राबल्य आहे असे त्यास वाटते; त्यामुळे जातिवंत दुष्ट माणसे त्यांच्या कादंबऱ्यांतून भेटत नाहीत हे एक त्यांच्या निरीक्षणशक्तीचे वैगुण्य आहे.

विवाहविषयक त्यांच्या मौलिक निरीक्षणाचे महत्त्व मान्य करूनही समतोल व स्थिर वृत्तीच्या अभावामुळे त्यातील बहुतेक विचार पारखून घेण्याची आवश्यकताही मुद्दाम प्रतिपादावी लागते. वैदिक कालखंडापासून मूलसंशोधन-प्रवृत्तीनुसार त्यांच्या बहुतेक सर्व कल्पना पारखून घेण्याचा खटाटोप करणे ही एक प्रचंड गोष्ट आहे, व त्यातच त्यांच्या विचारशक्तीची भरारी व व्यापकता दिसून येते.

---

# साहित्य-समीक्षा

## सांगावा

लेखक– **शंकरराव खरात**
काँटिनेंटल प्रकाशन, पुणे २.
मूल्य ३॥ रु.

'सांगावा' हा खरातांचा तिसरा कथासंग्रह. ग्रामीण जीवनाची वैशिष्ट्ये आणि ग्रामीण लोकभाषा यांच्याशी पूर्ण समरस होऊन लेखकाने या संग्रहातील १४ कथा लिहिल्या आहेत. 'सांगावा' आणि 'कमाई' या कथांचे नायक दारिद्र्याच्या, अस्पृश्यतेच्या हालअपेष्टा जन्मभर, पिढ्यान् पिढ्या मुकाट्याने सहन करतात. दारिद्र्याविरुद्ध झगडण्याचे सामर्थ्य असून आणि भरपूर शरीरमेहनत करूनही ते दारिद्र्यातून मुक्त होऊ शकत नाहीत. तरण्याताठ्या विधवा सुनेला आसवे गाळताना पाहून म्हातारा सावळा जगते जीव जगविण्यासाठी धडपडत बाहेर पडला. (पाणी) पण हृदयशून्य अंध रूढीच्या क्रूरपणाशिवाय त्याच्या वाट्याला दुसरे काय येते? दरिद्री आणि मागासलेल्या समाजात जन्मलेल्या, चिकाटीने शिक्षण पुरे करून शिक्षकाचे काम करणाऱ्या 'धर्मा मास्तरा'च्या वाट्याला येणारे दुःखही सुशिक्षित माणसाच्या विचारांना गती देणारे आहे. धर्मामास्तरच्या दुःखाद्वारे अनेक सामाजिक प्रश्न लेखकाने आपल्यापुढे मांडले आहेत. खेड्यातील शाळांमध्ये शिक्षक टिकून का रहात नाहीत व आपल्या अज्ञ बांधवांना शिकवून शहाणे करण्याचे कर्तव्य का पार पाडू शकत नाहीत या प्रश्नाचे चित्रण खरातांनी सहजगत्या पण परिणामकारक रीतीने केले आहे. 'डाव' या कथेत खेड्यातील सर्कल हा सरकारी नोकर नसून दहशतवाद व जुलूम निर्माण करणारा गुंड असला म्हणजे सतूसारख्या कष्टाळू माणसाच्या प्रेमळ संसाराची वाताहात कशी होते, ते रंगविले आहे. कल्पनातीत दारिद्र्यातदेखील जीवन जगण्याची धडपड माणूस करीत असतो. याचे चित्र 'पंचनामा' या कथेत रेखाटले आहे. हे चित्र रंगविताना निवेदनात्मक पद्धती स्वीकारूनदेखील लेखक अत्यंत यशस्वी झाला आहे. अन्नपाण्यावाचून मेलेल्या भिकाऱ्याच्या प्रेताच्या पंचनाम्यातील प्रत्येक शब्द काळजाला भिडतो. हे निर्मम आणि निरर्थक जीवन जगणारी माणसेही आपल्यासारखीच आहेत. पण त्याचे भान कोणालाच कसे नाही? 'लागीर' ही या संग्रहातील उत्तम कथा. निर्मळ वृत्तीने राहणाऱ्या तानीच्या पोटी जन्माला आलेले पोर आपल्या वंशाचा दिवा नव्हे हे ती उघड सांगू शकत नव्हती. कारण दुसऱ्याची पापवासना निसर्गाने तिच्या पोटात वाढविली होती. ती झुरत होती. नातू झाला म्हणून सासू हरखून गेली आणि झुरणीला लागलेल्या सुनेला भुताने झपाटले म्हणून सचिंत झाली. तानीच्या मनाची उलघाल रंगविताना खरातांच्या लेखणीने कमाल केली आहे! 'वाटा' आणि 'धोंड्या वेरड' या कथांत मनाने मऊ पण प्रसंगी जीवाचा नाश करण्यास सिद्ध होणारी कठोर माणसे पहायला मिळतात.

दारिद्र्य, अज्ञान, दैववाद, सत्प्रवृत्त व असत् प्रवृत्त लोक, स्त्रियांचे दागिन्यावरील प्रेम, करमणुकीची साधने, अंधरूढिप्रियता आणि सुखासाठी धडपड इत्यादि ग्रामीण भागातील विचार-विकारांचे वास्तवपूर्ण चित्र या संग्रहात दिसून येते. दुःख-दारिद्र्यामुळे ही माणसे असहाय, अगतिक बनली आहेत. जगण्यासारखे त्यांच्याजवळ काहीही नसता जीवन जगण्याची त्यांची धडपड सुरू आहे. त्यांची जीवनाची आसक्ती आणि कारुण्याने ओथंबलेले जीवन यांनी खरातांचे मन व्यापून टाकले आहे. पण तरीही ते रंगवितांना सरळ आणि मोजक्या शब्दांचा त्यांनी वापर केला आहे. अकारण वर्णन कोठेच नाही. व्यक्तींच्या दुःखांच्या सीमा कितीही मोठ्या असल्या तरी अत्यंत भावविवश होऊन किंवा त्या दुःखाबरोबर वहात जाऊन ते लिहीत नाहीत. संयमाने, एखाद्याच शब्दरेखेने ते आपले कार्य साधतात. त्यासाठी त्यांनी वापरलेली भाषाही अत्यंत लवचीक आहे. व्यक्तिपरत्वेच नव्हे तर भावनेबरोबरही भाषेत मोहक बदल होतो.

**शारदा देशमुख**

अनुक्रमणिका

# अघटित घटना

लेखक-रामतनय
हिंदुस्थान साहित्य, ३०९ शनिवार, पुणे.
मूल्य २॥ रु.

मोहित्यांची मंजुळा, खरा उद्धार, साखरगोटी या कादंबऱ्या लिहून ग्रामीण वातावरणाचे यथातथ्य चित्र उभे करण्यात गाजलेले जुन्या पिढीतील साहित्यिक श्री. रामतनय यांच्या लघुकथांचा हा संग्रह आहे. त्यात एकूण तीन कथा असून त्यांतील अघटित घटना या पहिल्या कथेचेच नाव त्यांनी संग्रहास दिले आहे. प्रथम कादंबऱ्या नंतर बालवाङ्मय अशा क्षेत्रात नाव मिळवून रामतनयांनी कथाक्षेत्रात प्रथमच पदार्पण केले आहे; पण हे पहिले पदार्पण देखील पूर्वीइतकेच यशस्वी ठरावे. समाजजीवनाचे प्रदीर्घ निरीक्षण व अनुभव यांचा ठसा यांतील प्रत्येक कथेवर दिसतो. पांढरपेशा, सुशिक्षित, त्याचप्रमाणे खेडवळ, वन्य समाज-प्रौढ, भारदस्त आणि परस्परांवर आकृष्ट झालेली आतुर आपुक मापुक-सर्व थरांतील पात्रे आपल्या जीवनातील त्या त्या वयांतील नैसर्गिक स्वभाववैशिष्ट्ये घेऊन त्यांच्या कथांत उभी राहिली आहेत. 'लाडक्याच्या लाडी'तील वारली समाजातील भिक्या लाडी व तिचा प्रियकर लाडल्या, 'शिरीषचे रहस्य'मधील शिरीष व विजया हे संगमोत्सुक युगुल, किंवा 'गिरजे गिरजे' मधील प्रेमाच्या त्रिकोणातील शिवा, गिरजा व राघू हे त्रिकोण त्यांनी त्यांच्या उत्कट व रसरसत्या भावनेची ओळख करून देऊन वाचकांसमोर उभे केले आहेत. नाहीतर त्या त्या समाजांतील वैशिष्ट्य, त्यांतील आग अणि धार यांचा यथार्थपणे वाचकांच्या हृदयाला स्पर्श होऊन ते गदगदले नाहीत तर त्या प्रसंगातील उत्कटता लेखकाने उभी केली असे कसे म्हणता येईल?

श्री. रामतनय यांचे सर्वच लिखाण सहेतुक असते. केवळ कलेसाठी कला हा काही साहित्यिकांचा सिद्धान्त त्यांना मान्य नसावा. कादंबऱ्या, बालकथा वा लघुकथा प्रत्येक ठिकाणी काही तरी तात्पर्य त्यांना वाचताना सांगावयाचे असते. फक्त तात्पर्य सांगताना ते रसहानी होऊ देत नाहीत; मग त्याला राजकीय, धार्मिक, सामाजिक वा निर्हेतुक सेवाभाव अशी कोणती का झाला असेना. १९४७ च्या भारताच्या फाळणीच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली त्यांची 'दिव्य आनंद' ही कथा पहा. भोळेभाबडे, उदार पण व्यावहारिक अर्थाने जगण्याला नालायक वाटावेत असे हिंदू आणि विश्वासघातकी, कपटी, स्वार्थी मुसलमान यांच्या संघर्षात कोण विजयी होईल हे काही निराळे सांगावयास नको. पण या संघर्षातही मानवतेचे, उदात्ततेचे, स्वार्थत्यागाचे दिव्य दर्शन घडते, त्यामुळेच जेत्याच्या दृष्टीने जगायला नालायक असलेला हिंदु समाज हजारो वर्षे होऊनही सर्व आघातांना तोंड देऊन टिकून आहे. पंजाबच्या त्या भीषण हत्याकांडातील अशा सर्व घटना किती हळुवारपणे परंतु प्रभावीपणे रामतनयांनी 'दिव्य आनंदी' या कथेत मांडल्या आहेत. पंजाबी संघस्वयंसेवकांच्या मदतीसाठी जे महाराष्ट्रीय स्वयंसेवक तिकडे धावून गेले व त्यांनी जिवाची कुरबानी करून अनेक भगिनींना सोडवून आणले पण आपली ओळख वा आपल्या साहसी पराक्रमाचा चुकून देखील उल्लेख त्यांनी कोठे केला नाही. त्यांच्या या विनम्र व समर्पित जीवनाचे चित्रण मोजक्या शब्दांत पण मनोरम पद्धतीत या कथेत पहावयास मिळते व 'दिव्य आनंदा'तील खरे 'दिव्यत्व' कोणते हे नेमके समजते. 'भयंकर हृदय' या कथेतील हृदयाला घरे पाडणारे कातकरी जीवन रंगविताना ख्रिस्ती मिशनऱ्यांचा सेवाभाव त्यांनी वाचकांपुढे ठेवला. त्याचबरोबर त्या मिशनऱ्यांना केवळ नावे ठेवण्याचेच कार्य आपण करीत असतो हे बजावण्यास लघुकथेचे मंत्र व तंत्र त्यांना आडवे येत नाही. तात्पर्य गळी उतरत असता कथेचे सौन्दर्य कमी होत नाही. त्यांच्या या कथांत शृंगार, अश्लीलता यांनाही भरपूर वाव होता. पण सवंग लोकप्रियतेचा हा मार्ग त्यांनी कटाक्षाने टाळला आहे व शृंगाराच्या प्रवाहात ते वाहून गेले नाहीत. वयाची ७५ वर्षे ओलांडताना जीवनाची यशस्विता संयमातच आहे हे त्यांनी खचित अनुभवलेले असणार. तोच संस्कारयुक्त संयम त्यांच्या लिखाणात न दिसला तर नवल.

पण रामतनय यांचा खरा पिंड कादंबरीकाराचाच. संग्रहातील त्यांची एकएक कथा एकेका कादंबरीचा विषय झाली असती. इतक्या घटना व प्रसंग त्यांनी प्रत्येक कथेत खेचून भरले आहेत. मर्यादित क्षेत्रात, मर्यादित शब्दांत कथेचा आशय समजावून सांगताना व भावनाविष्कार करताना त्यांना अनेक वेळा एकेक प्रसंग एकेका वाक्यात वा परिच्छेदात आटोपता घ्यावा लागला आहे हे जाणवल्याशिवाय रहात नाही.

**विप्र**

# निगूडा

लेखक–वि. शं. पारगावकर
शुभदा प्रकाशन, पुणे ४
मूल्य २॥ रु.

निगूडा ही पारगावकरांची दुसरी लघुकादंबरी. ललाट या कथेहूनच नव्हे तर इतर अनेक कथाकादंबऱ्यांहून या कथेचा विषय व तिचे स्वरूप अगदी वेगळी आहेत. लाखो वर्षापूर्वीच्या प्राथमिक अवस्थेतील माणसांच्या जीवनाचे चित्र रेखाटण्याचा प्रयत्न ह्यात लेखकाने केला आहे. त्यानेच म्हटल्याप्रमाणे, अखंडपणे वाहत आलेल्या मानवी जीवनातील प्रथमावस्थेच्या काळातील माणसांच्या जीवनाचे ते एक रूप आहे. ते रूप शोधण्याचा हा एक कल्पनारम्य प्रयत्न आहे. इतक्या दूरवरच्या कालखंडात कल्पनेने प्रवेश करणे फार कठीण काम आहे, परंतु पारगावकरांनी ते काम बऱ्याच सफळतेने केले आहे. आजच्या प्रगत अवस्थेतील मानवी जीवनामध्ये वावरणाऱ्या लेखकाला आपले आजचे ज्ञान बाजूला ठेवून हे ज्ञान नुकतेच जेव्हा क्षणशः कणशः साठत होते तेव्हाच्या अवस्थेशी समरस होणे ही गोष्ट सोपी नाही. अनेक पथ्ये लेखकाला पाळावी लागतात. ही एक प्रकारची मानसिक बौद्धिक व कल्पनात्मक कसरतच म्हटली पाहिजे. श्री. पारगावकरांच्या प्रतिभेने ही कसरत कौतुकास्पद रीतीने केली आहे हे नमूद करण्याला मला आनंद वाटतो.

या लहानशा कादंबरीत एक लहानसे कथानक लेखकाने गुंफले आहे. परंतु लेखकाचा हेतू एखाद्या कथानकाच्या गुंफणीपेक्षा त्या प्राचीन काळातील मानवाच्या मंदगतीने प्रगत होणाऱ्या जीवनाचे एक ओझरते दर्शन करविण्याचाच आहे. आणि ते रास्तच आहे. शिकारीवर जीवन जगणारा, टोळी करून राहणारा, बराचसा भटक्या पण हळूहळू एका ठिकाणी स्थिर होऊ इच्छिणारा, कृषिकर्माचा शोध न लागलेला असा मानव व त्याचे निसर्गाच्या तावडीत सापडलेले, हतबल परंतु तरीही वर्धमान असे जीवन यात रेखाटले आहे. हिंस्र श्वापदांनी गजबजलेल्या घनदाट अरण्याची पार्श्वभूमी घेऊन तिच्यावर एका टोळीतील मानवांच्या विविध शारीरिक, मानसिक बौद्धिक हालचालींचे चित्रण शिताफीने व सावधगिरीने लेखकाने केले आहे. त्या माणसांच्या काम, क्रोध, द्वेष, मत्सर इत्यादि वासना त्यांचे शौर्यधैर्य, संरक्षणसंवर्धनादि त्यांच्या समस्या, त्यांची संघटना, त्यांचे अनुभव, निसर्गशक्तीशी त्यांना करावा लागणारा झगडा, त्यात दिसून येणारे त्यांचे दौर्बल्य प्रसंगा-प्रसंगाने त्यांच्या हरतऱ्हेच्या अनुभवात पडणारी भर आणि त्यामुळे होणारा त्यांच्या हरतऱ्हेच्या जाणीवांचा विकास हे सर्व थोडक्यात परंतु मोठ्या कल्पकतेने पारगाव-करांनी वर्णिले आहे. त्यातच मातृत्व,मित्रप्रेम, सौंदर्याची जाणीव, चित्रकला, नृत्यकला, इत्यादि कलांचा उगम याही गोष्टी त्या काळी हळूहळू कशा उदित झाल्या असतील हे कल्पनेने हेरून शब्दांकित करण्याचा प्रयत्न लेखकाने केलेला दिसतो

हे सर्व पारगावकरांनी कौशल्याने साधले आहे. परंतु त्यांच्या प्रतिभेला जाणीवपूर्वक कसरत करावी लागली आहे; हे मात्र ही कथा वाचीत असताना अनेकदा जाणवल्यावाचून रहात नाही. काळाच्या दृष्टीने फार मोठी झेप घ्यावी लागल्यामुळे असे होणे काही प्रमाणात साहजिक आहे. एक गोष्ट मात्र मुद्दाम सांगितली पाहिजे ती ही की हे चित्रण रुक्ष न करता त्या आदिमानवांच्या अविकसित भावभावनांचे रंगही त्यात भरले आहेत. आणि त्यामुळे त्या मानवांच्या सुखदुःखाशी काही प्रमाणात का होईना वाचक समरस होऊ शकतो.

या एका वेगळ्या प्रयत्नाबद्दल श्री. पारगावकरांचे मी अभिनंदन करतो आणि त्यांच्या प्रतिभेतून अशाच प्रकारच्या परंतु अधिक पल्लवित, अधिक रसाळ व सहज-सुंदर वाङ्मयकृती निर्माण होवोत असे इच्छितो.

श्री. मा. कुलकर्णी

अनुक्रमणिका

# साहित्य-साधना

लेखक– मा. का देशपांडे
कॉंटिनेंटल प्रकाशन पुणे २;
मूल्य १५ रु.

साहित्यविषयक तत्त्वचर्चेचे स्थूलमानाने तीन प्रकार कल्पिता येतील. पहिला म्हणजे साहित्यविषयक रूढ सांप्रदायिक विचारसरणी न स्वीकारता संपूर्णपणे स्वतंत्र दृष्टिकोनातून साहित्यविषयक प्रश्नांचा विचार करून नवीन सिद्धान्त प्रस्थापित करणे, आणि या नवीन सिद्धान्ताच्या आधारे साहित्यचर्चा करणे. इंग्रजीत कॉलरिज, मॅथ्यू अर्नोल्ड आणि आय्. ए. रिचर्डस् यांनी व मराठीत श्री. व्यं. केतकर ( महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण ) आणि बा. सी. मर्ढेकर ( सौन्दर्य आणि साहित्य, Arts and Man वगैरे ) यांनी हा स्वतंत्र मार्ग चोखाळला आहे. अशा स्वतंत्र प्रज्ञेच्या लेखकांच्या विचारानेच साहित्य-शास्त्र समृद्ध होत असते. त्यांचे सर्वच विचार मान्य होतील असे नाही. पण डोळ्यांवरची झापड उडवून खडबडून जागे करण्याचे व नव्या दृष्टिकोनातून विचार करण्याची प्रेरणा देण्याचे कार्य अवश्य होते.

दुसरा प्रकार रूढ साहित्यशास्त्राच्या आधारे साहित्याचा पुनर्विचार करून त्या रूढ चाकोरीत राहूनच तत्त्वचर्चा करणे व असे करीत असतानाच साहित्यशास्त्राची अंतर्गत पुनर्रचना करणे. प्रा. रा. श्री. जोग यांचा ‘अभिनव काव्यप्रकाश’, प्रा. वाटवे यांचा ‘रसविमर्श’ व प्रा. वा. ल. कुलकर्णी यांचे टीकालेखन या प्रकारात येते. नवीन स्वतंत्र विचाराइतकीच अशी तत्त्वचर्चा साहित्य-शास्त्राच्या प्रगतीस उपकारक ठरते.

तिसरा प्रकार म्हणजे साहित्यविषयक सर्व प्रचलित विचारांचे संकलन करून त्याच्या आधारे साहित्यातील विविध प्रवृत्तींचा मागोवा घेणे व साहित्याचा आस्वाद घेणे हा होय. संकलनात्मक तत्त्वचर्चा व आस्वादक टीका असे या साहित्यचर्चेचे दुहेरी स्वरूप असते. प्रा. फडके, श्री. खांडेकर यांचे टीकालेखन व इतर अनेक लेखकांचे स्फुट टीकालेख यांचा या प्रकारात समावेश होतो. प्रा. मा. का. देशपांडे यांच्या प्रस्तुत ‘साहित्य-साधना’ ह्या ग्रंथाचे स्वरूपही या प्रकारचेच आहे असे म्हणावयास हरकत नाही.

‘साहित्यविषयक काही प्रश्नांचे स्वरूप समजावून घेण्याचा हा एक प्रयत्न आहे’ असे या ग्रंथाचे वर्णन प्रा. देशपांडे यांनी आपल्या प्रास्ताविकात केले आहे. सांप्रदायिक रीत सोडून व पांडित्यप्रदर्शनाचा मोह टाळून विवेचन केले आहे असेही ते सांगतात. पण विवेचनाची सांप्रदायिक रीत सोडली असली तरी बहुतेक सर्व विवेचन सांप्रदायिक स्वरूपाचेच झाले आहे असे वाटते.

या ग्रंथातील विषयाचे विवेचन आणि शैली यांवर प्रा. ना. सी. फडके यांच्या ‘प्रतिभासाधना’ चा केवढा प्रभाव पडला आहे याची कल्पना ही दोन्ही पुस्तके एकत्र वाचली असता कोणासही सहज येईल. विषयाची मांडणी आणि अनौपचारिक शैली यांमधून तर हा प्रभाव विशेषच जाणवतो. उदाहरणार्थ, वाङ्मयाची सर्वमान्य व्याख्या करणे किती कठीण आहे हे सांगताना लेखक लिहितात “म्हणजे मौज पाहिलीत ना! वीर गेले जोरजोरात लढाई खेळायला, अन् बसले नुसते हवेत पट्टे फिरवीत!”

प्रस्तुत ग्रंथ जरी १९६१ मध्ये प्रसिद्ध झाला असला तरी लेखकाचे एकंदर विवेचन प्रतिभासाधनातील साहित्य-विषयक प्रश्नांच्या चर्चेच्या पुढे फारसे गेले आहे असे वाटत नाही. साहित्यविषयक प्रश्नांची तात्त्विक चर्चा करताना १९४० नंतर मराठी साहित्यात जो सर्वांगीण बदल होत गेला त्याची दखल घेणे आवश्यक आहे असे वाटते. तसे न केले तर साहित्यचर्चा अपुरीच राहील. मराठीतील हे नवसाहित्य अनुभूतीनिष्ठ होत गेल्याने साहित्यचर्चेचे रूढ स्वरूप त्याने पार बदलून टाकले आहे. साहित्य मूल्यमापनाची नवी मूल्ये प्रस्थापित झाली आहेत. त्यांचा विचार होणे आवश्यक आहे असे वाटते.

काव्यात केशवसुत, गडकरी, व तांबे, कादंबरीत फडके, खांडेकर व माडखोलकर, नाटकांत खाडिलकर, कोल्हटकर व गडकरी, लघुकथा-लघुनिबंधात फडके व खांडेकर याच लेखकांच्या कृतींच्या आधारे प्रामुख्याने सर्व चर्चा केली आहे. या लेखकांच्या खेरीज इतरांकडून मराठीत श्रेष्ठ दर्जाचे साहित्य लिहिले गेलेच नाही असा जर हा ग्रंथ वाचून काही वाचकांचा ग्रह झाला तर तो फारसा चुकीचा आहे असे म्हणता येणार नाही. प्रा. देशपांडे यांनी स्वतःच्या लिखाणाचा चर्चेत उदाहरणे म्हणून उपयोग करून घेतला नसता तर बरे झाले असते असे वाटते.

ग्रंथातील विषयाचे विवेचन सांप्रदायिक स्वरूपाचेच असल्याने आवर्जून परामर्श घ्यावा असा साहित्यविषयक विचार येथे क्वचित आढळतो. सर्वच विवेचन ढोबळ, संकलनात्मक व त्रोटक टिपणांच्या स्वरूपाचे आहे.

लेखकांनी आपल्या प्रास्ताविकात म्हटल्याप्रमाणे, स्कॉट-जेम्स, हडसन, अेबरक्रोंबी इत्यादी इंग्रज समीक्षकांच्या साहित्यविषयक चर्चेचा सरसकट अनुवाद अगर संकलन करण्याकडेच लेखकांची प्रवृत्ती दिसते. 'नाटका'-वरील चर्चेत लेखक स्पष्टच लिहितात: "खालील विवेचन करताना प्रो. अल्डाईस निकल यांनी आपल्या 'नाट्यतंत्र' या ग्रंथात जे विचार मांडले आहेत त्यांचा उपयोग करून घेतला आहे." सॉमरसेट मॉम यांच्या लेखाचा विस्तृत अनुवाद, नाटक, या प्रकरणाच्या शेवटी येतो. असेच परभृत विवेचन सर्वत्र आढळते. सर्व तात्त्विक चर्चा सांकेतिक व सांप्रदायिक स्वरूपाची आहे. ते सर्व पाहून एक शंका मनात डोकावते. मराठी हा विषय घेऊन पदवी परीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांची गरज लक्षात घेऊन तर हा ग्रंथ लिहिला गेला नसावा? 'रसग्रहण' या प्रकरणात कथा, काव्य, कादंबरी व ललित निबंध वगैरेंची जी आदर्श (Model) रसग्रहणे दिली आहेत त्यावरून ही शंका थोडी दृढ होते.

लेखकांच्या प्रास्ताविकातील काही विधाने थोडीशी गैरसमज निर्माण करणारी असल्याने त्यांचा थोडक्यात परामर्श घेणे आवश्यक वाटते. साहित्यशास्त्रातील काही संज्ञा सैलपणे वापरल्या जातात अशी तक्रार करून अशा संज्ञांच्या अर्थावर नवीन प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केल्याचे लेखक प्रास्ताविकात सांगतात. Personality हा शब्द इंग्रजी टीकावाङ्मयात संयमाने वापरला जात नाही असे प्रा. देशपांडे यांचे मत आहे. कलावंताचे संपन्न व्यक्तिमत्त्व त्याच्या कलाकृतीत प्रगट झालेले असते हे त्यांना मान्य नाही. व्यक्तिमत्त्व म्हणजे कोणती तरी पूर्ण विकसन झालेली व सदैव अभंग राहणारी चीज आहे अशी इंग्रजी टीकाकारांची व्यक्तिमत्त्वासंबंधी कल्पना असल्याचा चुकीचा ग्रह प्रा. देशपांडे यांनी करून घेतला आहे. लेखकाचे व्यक्तिमत्त्व सतत अधिकाधिक संपन्न होत असते. उत्कट अनुभूती परिणामकारक रीतीने व्यक्त करण्याची त्याची धडपड सतत चाललेली असते असे इंग्रज टीकाकार मानत आले आहेत. व्यक्तिमत्त्व हा शब्द इंग्रज टीकाकार किती संयमाने व अर्थपूर्ण रीतीने वापरतात याची कल्पना प्रसिद्ध आंग्ल टीकाकार टी. एस्. ईलियट यांच्या पुढे दिलेल्या उताऱ्यावरून येईल:

ते म्हणतात, "The progress of on artist is a continual self-sacrifice, a continual extinction of personality... Poetry is not a turning loose of emotion, but an escape from emotion; it is not the expression of personality, but an escape from personality... The emotion of art is impersonal. And the poet cannot reach this impersonality without surrendering himself wholly to the work to be done."

कलावंताच्या व्यक्तिमत्त्वाची झेप ही सदैव विश्वात्मकतेचा वेध घेणारी असते.

'विनोदा'ची चर्चा करताना, विनोद हा सदैव विसंगतीवर आधारलेला असतो ही आंग्ल कल्पना आपणांस मान्य नसल्याचे लेखक सांगतात. हादेखील असाच एक गैरसमज आहे. विशुद्ध विनोद, कारुण्याची झाक असलेला विनोद यांची शेकडो उदाहरणे आंग्लसाहित्यातून काढून दाखविता येतील. लँब, चेस्टर्टन, लीकॉक, लिंड, 'साकी' वुडहाऊस, थर्बर वगैरेंचे विनोदी लिखाण विशुद्ध विनोदाचा आदर्श नमुनाच म्हटले पाहिजे.

प्रा. देशपांडे यांनी सुचविलेली, 'नटांनी करून दाखविलेली चित्तवेधक व सुबक कहाणी म्हणजे नाटक' ही व्याख्या देखील प्राथमिक स्वरूपाची वाटते. 'नाटक हे व्यक्तीसाठी नसून गर्दीसाठी आहे' ही प्रा. फडके यांच्या नाटकाच्या वर्णनाइतकीच तकलादू वाटते. इतर सर्व नाट्यचर्चा इंग्रजीतून संकलित केलेली आहे.

वर उल्लेखिलेले सर्व दोष लक्षात घेऊनही साहित्य-साधना हा एक माहितीपूर्ण ग्रंथ आहे हे मान्य केले पाहिजे. साहित्याचे स्वरूप व कार्य, विविध साहित्यप्रकार, साहित्यातील विविध वाद व त्यांचे स्वरूप, टीका आणि टीकाकार वगैरे साहित्याशी निगडित असलेल्या सर्व विषयांवर माहितीपूर्ण विवेचन जागोजागी आढळते. अशा ग्रंथात विचारांना चालना देण्याचे सामर्थ्य नसले तरी साहित्याच्या अभ्यासकास संदर्भ ग्रंथ म्हणून त्याची उपयुक्तता नाकारता येणार नाही. शेवटी एवढेच सुचवावेसे वाटते की, प्रा. देशपांडे यांनी १९४० नंतर मराठी साहित्यात निर्माण झालेल्या प्रवृत्तींचा परामर्श घेणारे एक पुरवणी प्रकरण लिहून ग्रंथाच्या विवेचनातील अपुरेपणाचे वैगुण्य दूर करावे. शिवाय त्यांची स्वतःची साहित्यविषयक भूमिकाही थोडी अधिक स्पष्ट होण्यास अशा विवेचनाची बरीच मदत होईल.

म. ग. देसाई

# अनामिकाची चिंतनिका

लेखक– पु.य.देशपांडे
नागपूर प्रकाशन, नागपूर, १.
मूल्य ४ रुपये.

'अनामिकाची चिंतनिका' हा ११२ पृष्ठांचा छोटा ग्रंथ १९६१ साली प्रसिद्ध झाला. परंतु १९६२ च्या उत्तरार्धात लेखकाला त्या ग्रंथाबद्दल साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळेपर्यंत नियतकालिकांत, वृत्तपत्रांत किंवा सामान्यतः वाचकांतही त्याचा विशेष बोलबाला झाला नव्हता. त्यानंतर त्या ग्रंथाबद्दल पुष्कळ लिखाण प्रसिद्ध झाले आहे व अशा बाबतीत अनेक वेळा होते त्याप्रमाणे प्रथम झालेल्या अनुल्लेखाचे अगदी दुसरे टोक आता गाठले गेले आहे. ग्रंथकार पु. य. देशपांडे हे लेखक म्हणून आज २५ वर्षांहून अधिक सुप्रसिद्ध आहेत. सुमारे ३० वर्षांपूर्वी त्याचे 'बंधनाच्या पलीकडे' हे पुस्तक प्रसिद्ध झाले, त्या वेळी झालेली खळबळ अजूनही अनेकांच्या स्मरणात असेल. एक प्रकारची विशेष भाषाशैली व आपल्या व्यक्तिमत्त्वाचा लेखनावर जिवंत ठसा उमटविण्याची हातोटी श्री. देशपांडे यांस आहे. 'बंधनाच्या पलीकडे' यानंतर दुसऱ्याही गोष्टी, कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या व त्यांत तितके नावीन्य नसले तरी एकंदर लिखाणाचा प्रकार व दर्जा तसाच होता. 'अनामिकाची चिंतनिका' हे पुस्तक व आता अमृतानुभवाबद्दल प्रसिद्ध झालेला त्यांचा ग्रंथ हे लिखाण अगदी वेगळ्या स्वरूपाचे आहे असे दिसते. लेखकाच्या आस्थेचें विषय आता संपूर्णपणे बदलले असल्यामुळे त्याच्या लिखाणाचे विषयही बदलले आहेत. प्रस्तुत परीक्षणात तत्त्वज्ञान विषयाचा एक अभ्यासू म्हणून 'अनामिकाच्या चिंतनिके'त जो तत्त्वविचार मांडला आहे, तो कितपत स्वीकरणीय आहे याची काहीशी चर्चा करण्याचे योजिले आहे. साहित्य म्हणून तांत्रिक दृष्ट्या या पुस्तकाचे परीक्षण करण्याचा परीक्षकाचा इरादा नाही. परंतु एक सामान्य वाचक म्हणून त्याबद्दल एवढेच म्हणावेसे वाटते की, या ग्रंथाची भाषा जिवंत व सकस वाटली तरी जे व्यक्तित्व व जो दृष्टिकोन यांचा त्यात आविष्कार आहे ती चमत्कारिकप्रकारे मर्यादित आहेत व म्हणून लेखनशैलीतही एक प्रकारचा ठोकळेबाजपणा आला आहे. एखाद्या ग्रंथाची भाषाशैली व त्या ग्रंथाचा आशय यांचा मूलगामी व निकट संबंध असतो व आशयात काही महत्त्वाचे दोष असतील तर त्यांचा विवेचन-पद्धतीवर परिणाम झाल्याशिवाय राहत नाही, तसेच येथे झाले आहे. विवेचनात अनवश्यक पुनरुक्तीचा दोषही आढळतो.

'प्राक्कथन' या शीर्षकाखाली जे विचारदर्शन केले आहे, त्यावरून लेखकाला काय म्हणावयाचे आहे याची कल्पना येते. लेखकाच्या मते श्री. जे. कृष्णमूर्ती यांनी जीवनविषयक अत्यंत बहुमोल व क्रांतिकारक विचार मांडले आहेत. व त्यांच्याशी लेखक प्रायः सहमत आहे. "जीवजगताचे रहस्य म्हणजे 'जाणीव' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या वस्तूचे रहस्य व जाणीव म्हणजे क्षणाक्षणाला जे प्रतीत होते, ते ते जसे असेल तसे प्रतीत व्हावे यासाठी ठेवलेली केवळ साक्षी-वृत्ती ( Choiceless awareness ) किंवा अक्रिय पण तल्लख सावधानता ( Passive alertness ) हे आता अधिकाधिक उघड होऊ लागले आहे" हे शब्द मोठे मोहक वाटतात पण त्यांत सत्यांश किती आहे याचा विचार करण्यासारखा आहे. जीवजगताचे रहस्य जाणिवेत आहे हे खरे म्हटले तर जाणिवेचे रहस्य जीवजगतात आहे असेही म्हणण्यात सत्य नाही का? 'अक्रिय परंतु तल्लख' म्हणजे बरोबर काय? पूर्णतः आवडनिवड निःशेष झाली तर साक्षीवृत्ती तरी शक्य आहे का, व सार्थ होईल का या प्रश्नांचा विचारही ग्रंथकाराने केलेला दिसत नाही. पृ. ३० वर व इतर अनेक ठिकाणी 'जे असत्य वा अन्याय्य ते, इतर दृष्टीने कितीही प्रभावी व प्रगतिशील ठरलेले असो, भारतीय दृष्टीने ते त्याज्यच ठरविले जाईल' अशी विधाने आहेत. मग काय पाश्चिमात्य विचारवंतांनी असत्य व अन्याय्य जाणून बुजून स्वीकार्य ठरविले आहे? व भारतीयांनी त्याचा कधीच स्वीकार केला नाही? आता तरी समंजस व्यक्तींनी असली निराधार व व्यापक विधाने करू नयेत. ती असत्य व अन्याय्य आहेत हे जरा विचार करणाऱ्यासही दिसेल. व ती तत्त्वविवेचनास निरुपयोगी आहेतच. तसेच आणखी एक विधान 'आधुनिक मानव आणि विशेषतः बुद्धिवादी मानव हा अनंत संशयांनी पछाडला गेलेला प्राणी आहे' पृ. ५५ वर व इतर ठिकाणी आहे. खरोखर वस्तुस्थिती अशी आहे की– संशय व त्याची उत्तरे यांत वाटतो इतका फरक नाही. अनेक वेळा संशय येणे, प्रश्न सुचविणे यानेच सत्यदर्शन अधिक होते. 'आधुनिक विज्ञाना'च्या प्रगतीच्या अवलोकनाने ( पान ७१ वर )

ग्रंथकर्त्यास सुचलेले विचार तत्त्वज्ञानात नवीन नाहीत. बार्क्ले ( Berkley ) वाचूनही सुचण्यासारखे आहेत व त्यांना तत्त्वज्ञान्यांनी अनेक वेळा उत्तरेही दिली आहेत.

' मनुष्य अनुभवाने कधी शहाणा होत नसतो ' ही कृष्णमूर्तींची भूमिका ग्रंथकारास मान्य आहे परंतु मागील अनुभवामुळे नव्या अनुभवाकडे दुर्लक्ष केले जाऊ नये यापेक्षा त्यात सत्य नाही. शब्दशः ती घेतली तर पशूच्या अनुभव व विचारी माणसाचा अनुभव यात काही फरक करता येणार नाही. ' ईशावास्य उपनिषद् कधीच गतार्थ होत नाही ' याचे कारण सत्य गतार्थ होत नाही. श्री. देशपांडे यांनी अवतरणांत दिलेली इतर अनेक वचनेही तशी आहेत व नुसते शब्दच घेतले तर ते ईशावास्यातले असल्याने नित्य आहेत असे नव्हे. ' आपण सुधारलेले आहोत, प्रगतिशील आहोत, आपल्या पूर्वजांपेक्षा, सनातन्यांपेक्षा श्रेष्ठ आहोत, असे जे अनेक आधुनिक मानतात, तो निव्वळ भ्रम होय ' ( पान ७१ ) या विधानाचा पुरावा काय तर काही आधुनिक ' पाश्चिमात्य पंडितांची मते आपापल्या शैलीत लोकांना सांगत सुटणे म्हणजेच बुद्धिवान, ज्ञानवान होणे असे मानतात. ' जणू काही आधुनिकांच्या आधी उथळ, अविचारी शब्दावडंबराची हौस असलेले लोकच नव्हते !

ग्रंथ पुरा होण्याच्या वेळच्या घटनेविषयक जे विवेचन केले आहे व जो अर्थ सुचविला आहे तोही असाच निराधार वाटतो. कोणीही वैज्ञानिक नव्या अनुभवांचा विचार करण्यास नकार देत नाही. परंतु ' बरे वाटते ' हे तात्पुरते व भ्रममूलकही असू शकते व आजारी मनुष्याची प्रत्येक समजूत डॉक्टराच्या मताइतकीच महत्त्वाची समजणे अतिशय धोक्याचे होय हे स्पष्ट आहे.

अशी आणखीही अनेक स्थळे दाखविता येतील. तरीही ग्रंथात एक प्रकारचा जिवंतपणा आहे, विवेचनात जोम आहे व भाषाशैली आकर्षक आहे. तात्त्विक ग्रंथात अवश्य असलेली व्यक्तिनिरपेक्षक वृत्ती नाही व ' आधुनिक ', ' विज्ञान ', ' बुद्धिवादी ' यांना त्यांनी कोणासही न सुटणारे प्रश्न सोडविले नाहीत म्हणून व निष्कारणही दोष देण्याचा ' आधुनिक ' होत असलेल्या प्रवृत्तीचा मोह ग्रंथकार टाळू शकला नाही. ह्या मुख्यतः दोन उणीवा ग्रंथात आहेत. ग्रंथकाराची वैचारिक प्रगती सुरूच आहे तेव्हा कदाचित् पुढील एखाद्या ग्रंथात या ग्रंथातील भूमिकेला प्रभावी उत्तर देणारा ग्रंथही तेच लिहितील अशी आशा करू या.

प्र. रा. दामले

## काही शैक्षणिक समस्या

( डॉ. जेजुरीकर अभिनंदनग्रंथ ),
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २;
मूल्य ३॥ रु.

' डॉ. कृ. न. जेजुरीकर अभिनंदन ' ग्रंथात चौदा मराठी आणि आठ इंग्रजी असे एकूण बावीस लेख संग्रहित करण्यात आलेले आहेत. त्यामुळेच की काय विविध क्षेत्रांतील नामवंतांना देखील आपल्या विषयाचे समग्र विवेचन करण्याचा अवकाश लाभलेला नाही. कारण हे सारे लेख अवघ्या १६९ पृष्ठांत कसेबसे रिचवलेले आहेत. आमची विद्यापीठे ( प्रा. गोवर्धन पारीख ), प्राथमिक शिक्षणाचा दर्जा ( टी. पी. अत्तरदे ) यांचे विवेचन तर तोंडी लावण्यासारखे झाले आहे. तर डॉ. पानसे, द. रा. परांजपे, प्रा. एन् आर्. देशपांडे आदींनी अनेक वेळा सुपरिचित असलेल्या जीर्ण मुद्द्यांचे अकारण पुनर्मुद्रण केलेले आहे. नाही म्हणायला श्री. एस्. एम्. जोशी यांची ' तेव्हा आणि आता ' ही एकुलती एक गुजगोष्ट मन वेधून घेते. पण हा लेख या संग्रहात का याचे उत्तर मिळत नाही. ' शिक्षणसंस्थांपुढील समस्या ' हा डॉ. वा. रा. ढमढेरे यांचा लेख इतक्या सावधगिरीने लिहिला आहे की शिक्षणसंस्थांच्या नियामक किंवा सल्लागार मंडळांच्या सदस्याची ती सामाजिक शोकांतिका ठरावी. अतिशय त्रोटक आणि वेताच्या इंग्रजी भाषेत लिहिलेले लेख याहून दर्जेदार झाले असते असे लेखकांची नावे वाचून वाटते. शीर्षकाने तर फारच मोहक असा ' भ्रांतिमान ' अलंकार व्यक्त करून या सर्व प्रयत्नाला अस्वस्थ केलेले आहे. छपाई, संपादन, निवड इ. गोष्टींमागे ' घाई ' फार दिसते. त्याचा अपरिहार्य परिणाम जाणवला तर तो सहन केला पाहिजे.

चंद्रकुमार डांगे

# रामकवि-कृत 'भाषाप्रकाश'

संपादक- शं. गो. तुळपुळे,
प्रकाशक- व. ह. गोळे, पुणे विद्यापीठ, पुणे ७.
किंमत पाच रुपये

पुणे विद्यापीठाच्या वतीने 'प्राचीन मराठी गद्य-पद्य माला' प्रसिद्ध होत असते. तंजावरकडील कवी माधवस्वामी यांच्या 'योगवासिष्ठा'चा पहिला भाग विद्यापीठाने १९५८ मध्ये प्रसिद्ध केला. त्यानंतर अलीकडेच 'रामकवि'कृत "भाषा-प्रकाश" हा कोश वरील मालेतून प्रकाशित होत आहे.

डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी हा प्राचीन शब्दकोश उत्तम रीतीने संपादित करून मराठी रसिकांसमोर ठेवला आहे. या कोशाचे हस्तलिखित तंजावर येथील सरस्वती-महाल ग्रंथालयात उपलब्ध झाले. हस्तलिखित स्वरूपात, प्रकाशाची वाट पहात कित्येक वर्षे पडून राहिलेल्या या कोशास उजेडात आणून डॉ. तुळपुळे यांनी मराठी भाषेची मोठी सेवा केली आहे असे म्हणता येईल. प्रस्तुत कोशाच्या विस्तृत व विवेचक प्रस्तावनेमध्ये प्राचीन मराठीतील कोशवाङ्मयात आपल्या स्वरूपाने आगळा दिसणारा हा भाषाप्रकाश किती महत्त्वाचा आहे हे डॉ. तुळपुळे यांनी सविस्तर व सप्रमाण निवेदिले आहे.

या कोशाचे एकूण २३ वर्ग किंवा विभाग आहेत. ते सारख्याच लांबीरुंदीचे नाहीत. तथापि, ते सर्व मिळून सुमारे साडेचार हजार मराठी शब्दांचा येथे संग्रह केलेला आढळतो. शब्द विषयवारीने दिले आहेत व अनुष्टुभ छंदात ते योग्य तऱ्हेने गोविले आहेत. लेखक कर्नाटकात वास्तव्य करणारा व मराठी भाषेचा अभिमानी आहे. "महाराष्ट्रक भाषाब्धि पार खोलीही नेणता" असा त्याने मराठी भाषेचा गौरव केला आहे, आणि या भाषासमुद्रातील काही शब्द देशांतरीच्या देशस्थांना उपयोगी पडावे म्हणून त्याने एकत्रित केले आहेत. ज्ञानेश्वरीचाही लेखकाचा चांगला व्यासंग असावा असे दिसून येते. किंबहुना डॉ. तुळपुळे यांनी निर्देशिल्या-प्रमाणे ज्ञानेश्वरीतील काही विवाद्य शब्दांचे अर्थ निश्चित करण्यास या कोशाचा चांगलाच उपयोग होईल यात शंका नाही.

रामकवी याने अत्यंत परिश्रमपूर्वक या कोशाची रचना केली हे कोशातील कोणतेही चार श्लोक वाचताच ध्यानात येते. एका वस्तूचे निर्देशक असे अनेक शब्द रामकवीने एकत्रित केलेच आहेत. त्यांचे लिंगस्वरूप दर्शविण्याचीही 'तो, ते आणि तें' अशा संज्ञा वापरून योजना केली आहे. एकच शब्द अनेक रीतींनी उच्चारला जात असल्यास त्याची ती, ती, विविध रूपेही कवीने दिली आहेत हे विशेष होय. उदाहरणार्थ, 'गाव ते गाउलीही ते'; 'म्हैस, मैस, महीस'; 'खळगा, टोणगा, रेडा, म्हैसा, मैसा, हाला, हाल्या'.

शब्दरूपे सांगताना, 'गहू', 'घऊ'; सेनणी, सेंदणी; हिरडा, हरडा; अरती, आरती; अंगोटा, अंगटा; कसे, कैसे, कइसे; अशा शब्दांत, डॉ. तुळपुळे म्हणतात त्याप्रमाणे, कोशकार त्याच त्या शब्दांची पुनरुक्ती करतो, हे खरे आहे, पण ती त्याने भाषेतील अनेक उच्चारपर्याय देण्याच्या दृष्टीनेच केलेली दिसते.

लेखकाच्या दृष्टीने जो जो महत्त्वाचा शब्द त्याला मराठी म्हणून ज्ञात होता तो तो त्याने साक्षेपाने संग्रहित केला आहे. या सर्व शब्दांना अनुष्टुभात गोवताना कोठे कोठे त्याच्या शब्दाच्या अर्थाची किंवा व्युत्पत्तीचीही कल्पना लेखकाने दिली आहे. अशा श्लोकांतून कोश-रचनाकाराच्या बुद्धीचे विशेष चातुर्य दिसून येते. तो प्रज्ञावन्त तसाच प्रतिभावन्त असावा हे, काही ठिकाणी त्याने दिलेल्या शब्दांच्या व्युत्पत्तीवरून दिसून येते. दानवर्ग हा जो तिसरा वर्ग त्यात प्राचीन मराठीत आढळून येणारे कितीतरी प्रसिद्ध-अप्रसिद्ध शब्द संग्रहित केलेले आढळतात. लाच हे दानच आहे, पण त्याचा विशेष रामकवी पुढीलप्रमाणे सांगतो— "**लाभासक्तीमुळे चौर्ये देणे ते 'लाच' बोलिजे**" याखेरीज "चरित्रे राजयाची जे **पवाडे** म्हणिजेत ते", "क्रिया असो नसो व्हावी प्रसिद्धी म्हणवोनिया। रचणे मांडणी फार तो **अखाडा, अडंब्र**, ते॥"

"कौशल्य ते **कुलकर्णी** तेच चातुर्य बोलिजे", "शोके भयेही जडला ध्यास तो होय **धोसरा**" ही वरील संदर्भात उद्धृत करण्याजोगी काही मनोज्ञ उदाहरणे आहेत.

एकेक वर्ग घेतला की त्याच्या वर्गातील महत्त्वाचे बहुतेक सर्व शब्द 'भाषाप्रकाश'कार आपणांपुढे व्यवस्थित रूपात मांडून ठेवतात; व ते वाचत असताना एखाद्या भाषाशब्दांच्या चित्तहारी प्रदर्शनातूनच आपण हिंडत आहोत की काय, असा मनाला भास होतो! एकीकडे मराठी शब्दांचे अर्थसूचक वैभव ध्यानात भरते तर दुसरी-

कडे त्यांची विविधता आपले मन वेधून घेते. काही काही ठिकाणी तर सुचविलेल्या अर्थवैशिष्ट्यामुळे किंवा व्युत्पत्तिवैशिष्ट्यामुळे आपण थक्क होऊन जातो. **अंगवर्ग** या विभागात शरीराच्या सर्व अवयवांच्या वाचक शब्दांची मोठी मजेदार गुंफण केली आहे. गुह्यावयववाचक शब्द वर्णांच्या उलट्या क्रमाने नोंदवून, सर्व शब्द देऊनही, अर्वाच्यपणाचा दोष टाळला आहे. '**डोळा**' या शब्दाची व्युत्पत्ती देताना '**ज्यातील बुबुळ इकडे तिकडे डोलते तो डोळा किंवा दोळा**' अशी व्युत्पत्ती सांगितली आहे, ती सुतराम् लक्षणीय वाटते.

ज्ञानेश्वरीतील शब्द तर यात अनेक भेटतात, हे वर सांगितलेच आहे. 'सुरवाडले', 'डांग', 'निमथा', 'चवरे' अशा शब्दांचे कोशकाराने दिलेले अर्थ ज्ञानेश्वरीच्या अर्थनिश्चितीला निश्चितच उपकारक ठरणारे आहेत. 'अखूर' किंवा 'आकर' या ज्ञानेश्वरीतील शब्दाबद्दल अलीकडेच विद्वानांत चर्चा झाली होती. कोशकार महाराष्ट्राच्या खेड्यापाड्यांतून रूढ असलेला समुचित अर्थच पुढीलप्रमाणे देतात :

" जेथे वेशीपुढे ठाती गुरे सर्व मिळोनिया ।
तया ठायाप्रति नाम अखूर म्हणवोनिया ॥" (२३-११)

या 'भाषाप्रकाशा'चा मराठीच्या अभ्यासकांना अनेक दृष्टींतून अभ्यास करता येण्याजोगा आहे. **देवताविषयक वर्गात** विठ्ठलाचे 'विठलु' हे नाव दिले आहे ते कोणास महत्त्वाचे वाटेल, तर **अनौषधी वर्गातील** विविध वृक्षादिक नामावली कोणाचे लक्ष वेधून घेईल. अर्थात वनौषधींची नुसती नामावलीच नसून त्या विस्तारतात, पिकतात, फळतात, कोमेजतात, सुगंध देतात तेव्हा त्या त्या अनुषंगाने तत्क्रियावाचक अनेक शब्दांचा संचय रामकवीने केला आहे! 'सुरवाडले', 'पाल्हेजले', 'कोमाईले', 'उफाळिले' इत्यादि क्रियावाचक शब्द आपले लक्ष वेधून घेतात. जेवणाखाण्याच्या पदार्थांतील तर आपणांस आज माहीत नसलेले अनेक शब्द येथे दिले गेले आहेत. त्यांतही "वांगे ते शाखनायक" असे शेरे कवी मधूनमधून देतच राहतो!

विविध वर्गांत देऊन उरलेले शब्द '**नानार्थ वर्ग**' या नावाने कवीने दिले आहेत. हा वर्ग एकवीस वर्गांत नववा म्हणून दिला असला तरी तोच **शेवटचा** असावा असा तर्क वाहतो. कारण, इतर कोण याही विभागाच्या शेवटी नसलेली समाप्तिसूचक पुढील ओळ या वर्गाच्या शेवटी आहे—

(९-२६६)

॥ इति श्रीनृसिंव्हानुचर रामकविविरचित भाषाप्रकाशे नानार्थवर्गसमाप्तः ॥

नानार्थवर्ग हे या पुस्तकातील एकच प्रकरण वाचले तरीही कोशकाराच्या वैशिष्ट्याची, कल्पकतेची व बुद्धिमत्तेची कल्पना येते. हा नानार्थवर्ग त्याने अकारविल्हेने 'अ' पासून 'ज्ञ' पर्यन्त दिला आहे. त्यांतील एकदोन श्लोक कल्पना यावी म्हणून खाली उद्धृत करीत आहे :

" **फुलबाण** अशा शब्दीं स्मर, भूसनळा, तथा ।
**फलाणा** अमका आणी चण्याचीं बोंडसें तथा ॥ "
(९-२६१)

" **फोडणें** भंगणें लोकां फितव्यामाजि काढणें ।
**फोडणें** म्हणिजे गोष्टी प्रसिद्ध करणें जनीं ॥ "
(९-२६२)

" **बाळी**, मुलीही कन्याही कर्णभुषणभेदही ।
**वाहुली** तारका चित्र बाहोली बाहुली तथा ॥ "

मराठी भाषेचे शब्दभाण्डार ध्यानात येण्यास या प्राचीन शब्दकोशाचा फार उपयोग होईल. डॉ. तुळपुळे म्हणतात त्याप्रमाणे या कोशाचे स्थान मराठीमध्ये एकमेवाद्वितीय असेच आहे. तंजावरकडील प्रांतात मराठी भाषेवर द्राविडीचे कोणते संस्कार घडले असावेत याचीही अल्पस्वल्प कल्पना या कोशावरून येऊ शकेल. शहाजीराजे भोसले यांनी मराठीचा प्रसार तिकडे केलाच होता. तिकडील व सीमाभागातील प्रांतात मराठी भाषेत विविध शब्द कसे रूढ होते व आहेत हे या कोशावरून ध्यानी येईल. 'बुत्ति' हा कानडी शब्द सांगली-मिरजेकडील भागात अद्यापही रूढ आहेच, तीच गोष्ट किल्लीची. कोशात 'कुलूपाचा हात किल्ली असे म्हटले आहे. किल्लीला 'हात' असेच तिकडे सर्रास म्हटले जाते.

**जगती वर्ग** हा यातील वर्ग संकीर्ण स्वरूपाचा असे संपादक म्हणतात. परंतु यात गृहविषयक व घरातील काही वस्तूविषयक, जमीनविषयक, खाणीविषयक हेच शब्द विशेषेकरून (श्लोक १०७ पर्यंत) आले आहेत. जगती याचा अर्थ पृथ्वी हाच रूढ आहे. तेव्हा कोशकाराने या विभागास योग्य तेच नाव दिले आहे असे वाटते.

एकूण पाहता मराठी दृष्टीने हा एक अपूर्व, ज्ञानेश्वरीच्या अभ्यासासही साहाय्यक असा अत्युपयोगी कोश डॉ. तुळपुळे यांनी संपादित करून उपलब्ध करून दिला याबद्दल त्यांस व पुणे विद्यापीठास कोणीही झाले तरी धन्यवादच देईल.

— **वि. म. कुलकर्णी**

# भाषा व संस्कृति

लेखक-**ना. गो. कालेलकर**
मौज प्रकाशन, मुंबई,
मूल्य ७॥ रु.

भाषाशास्त्राबद्दल जिज्ञासा असणाऱ्या सामान्य सुशिक्षित वाचकांसाठी डॉ. कालेलकरांनी लिहिलेला हा ग्रंथ सुलभ असूनही भाषाशास्त्राविषयी अधिकारवाणीने योग्य दृष्टी देणारा आहे. एवढेच असते तरी मराठी भाषेत ह्या ग्रंथाने टाकलेली भर महत्त्वाची ठरली असती; पण या ग्रंथातील विवेचन दुसऱ्या एका दृष्टीनेही मोलाचे आहे. इंग्रजी अमलाखाली, निसर्गविज्ञानांची ओळख आपल्याला फारशी होऊ शकली नाही. त्या काळातले शिक्षण निसर्गशास्त्रांच्या ज्ञानाला आणि वाढीला अनुकूल नव्हते. समाजविषयक शास्त्रांमध्ये मात्र अशी प्रतिकूल परिस्थिती नव्हती. पण दुर्दैवाने आपल्याकडे शास्त्रीय दृष्टीची परंपरा नव्हती आणि दुराग्रह बळावण्याला उपकारक अशा गोष्टीमात्र परकीय अमलामुळे उपस्थित झाल्या होत्या. इतिहासाचे शास्त्र व संशोधन, भाषा आणि वंश या संबंधीची शास्त्रीय चिकित्सा आणि एकंदरच समाजजीवनाविषयीचे ज्ञान या बाबतीत आपल्याकडे जी नवी ज्ञानपरंपरा सुरू झाली ती पूर्वग्रहांनी व कोत्या अभिनिवेशांनी दूषित झाली. डॉ. कालेलकरांनी या दूषित परंपरेच्या वारशाकडे वाचकांचे लक्ष वेधले आहे. केवळ भाषाशास्त्रापुरतेच त्यांचे विवेचन असले तरी त्यातच आपल्या एकंदर ज्ञानपरंपरेतली दुर्बलता दाखविण्याचे महत्त्वाचे व आज निकडीचे कार्य त्यांनी पार पाडले आहे. भाषाशास्त्राविषयी सुशिक्षितांतही नुसते अज्ञान नाही तर शास्त्रीय ज्ञानाला अडसरासारखे ठरणारे पूर्वग्रह आहेत याची पदोपदी जाणीव करून देत त्यांनी आपला विषय सांगितला आहे.

त्यांच्या विवेचनामुळे येणारी डोळस आणि शास्त्रविनम्र वृत्ती, भाषा, संस्कृती व साहित्य अशा तीन क्षेत्रांत उपकारक ठरणारी आहे. भाषा हीच मुळात एक सामाजिक संस्था आहे, नव्हे सर्व श्रेष्ठ समाजसंस्था आहे असे त्यांनी म्हटले आहे, आणि मग या संस्थेचा समाजाच्या वर्ग-विभाजनाशी कसा संबंध येतो ते दाखवून त्यांनी भाषेतील 'शुद्ध-अशुद्ध 'पणाची मीमांसा केली आहे, व व्याकरणाचे योग्य स्थान दाखवून दिले आहे. अशा रीतीने, भाषा, व्याकरण, बोली इत्यादि विषयांच्या भोवती होणाऱ्या वादांतील खरे तारतम्य कोणते ते त्यांनी स्पष्टपणे मांडले आहे. या साऱ्या विस्तृत शास्त्रीय विवेचनाच्या पार्श्वभूमीवर त्यांनी 'कोंकणी 'चा प्रश्न फार उद्बोधक रीतीने मांडला आहे; उद्बोधक या अर्थाने की अशा भाषिक बाबींमध्ये राजकारण शिरून त्यात निष्कारण गोंधळ व कटुता निर्माण होणे कसे अनावश्यक आहे याची त्यांनी केलेली मीमांसा सहज पटणारी अशी आहे.

या ग्रंथाचे साहित्यिकांना महत्त्व आहे ते मुख्यतः 'भाषा व साहित्य ' या लेखाच्या दृष्टीने, तसेच 'भाषा : तिचे स्वरूप व शास्त्र ' आणि 'भाषा आणि संस्कृति ' या दोन पूरक लेखांच्या दृष्टीने. 'भाषा व साहित्य ' या लेखात व्यक्तिविश्वाचा बाह्यविश्वाशी संबंध कसा असतो व 'व्यक्ति-विश्वाचे हे दर्शन इतरांना घडविणे म्हणजेच भाषेचा कलात्मक उपयोग करणे ' कसे असते हे त्यांनी दाखविले आहे. भाषेचा वापर 'नवा संदर्भ ' देऊन करणे म्हणजेच साहित्य निर्माण करणे, अशी त्यांनी व्याख्या दिली आहे व मग इंग्रजी, फ्रेंच व मराठी साहित्यांतील उदाहरणे देऊन आपले म्हणणे विशद केले आहे. काव्याच्या भाषेत ध्वनीला असणारे स्थान कसे महत्त्वाचे ठरते याची मीमांसा त्यांनी केली आहे. साहित्यात शैलीचा अर्थ काय ? एका भाषेतून दुसऱ्या भाषेत साहित्याचे भाषांतर करणे दुष्कर का ठरते ? प्रत्येक भाषेची प्रकृती त्या भाषेतील साहित्याला मर्यादा कशी घालते ? मोरोपंतांनी यमकाची गुलामगिरी पत्करली याचे कारण काय ? अशा अनेक साहित्यविषयक प्रश्नांची उकल भाषाशास्त्रीय प्रमेयांच्या आधारे कशी होऊ शकते हे डॉ. कालेलकरांनी दाखवून दिले आहे. समाजजीवनाविषयी जशी खोल सहानुभूती त्यांच्या मनांत आहे. तशीच साहित्याविषयी उत्कट रसिकताही त्यांच्या हृदयात आहे याचे प्रत्यंतर हा लेख वाचताना येते.

मराठी वाचकांना विशेषतः साहित्यिकांना, भाषेविषयी प्रेम व जागरूकता असतेच, आणि स्वभाषेविषयी व तिच्या लेखनपद्धतीविषयी आपण सर्वच जण आस्था बाळगतो. पण ही जागरूकता व ही आस्था किती अपुरी आहे ! भाषेचे साधन हे सुसंस्कृत मानवाला लाभलेले केवढे मोठे वरदान आहे ! हे साधन किती विनम्र आणि विवेकपूर्ण रीतीने वापरणे इष्ट आहे ! याची जाणीव डॉ. कालेलकरांनी या ग्रंथामुळे आपल्याला करून दिली आहे, याबद्दल त्यांचे आपण सर्वजण नेहमी ऋणी राहू.

**दि. के. बेडेकर**

# प्राथमिक शिक्षणाच्या समस्या

लेखक—वा. ब. कर्णिक व मधुसूदन गोखले
टोकळ प्रकाशन पुणें २
मूल्य २॥ रुपये

महाराष्ट्र राज्याचे भूतपूर्व लोकशिक्षणाधिकारी श्री. वा. ब. कर्णिक आणि प्रा. मधूसुदन गोखले, आचार्य जावडेकर विनयभवन, गारगोटी या दोघा अनुभवी आणि साक्षेपी लेखकांनी प्राथमिक शिक्षणातील काही समस्यांवर सुबोध विवेचन करून, शैक्षणिक वाङ्मयात मोलाची भर टाकलेली आहे. अगदी पहिल्या प्रकरणात ऐतिहासिक पार्श्वभूमी निवेदन करीत असताना आजचे प्रश्न का व कसे निर्माण झाले याचे विवेचन आले असते तर पुढील प्रकरणात, प्रत्येक प्रश्नाला सांगावी लागणारी भूमिका, जी पुनरुक्त करावी लागली, ती टाळता आली असती. तद्वतच जीवन-शिक्षणाचा विचार करताना देखील प्रास्ताविक असा बराच भाग या पुनरुक्तीच्या दोषापासून टाळता आला असता. शिक्षकांचे प्रशिक्षण, साक्षरतेचा काळ, आर्थिक प्रश्न, अभ्यासक्रम, माध्यमिक शाळांतील पहिल्या तीन इयत्तांची (इ. ५ वी, ६ वी, ७ वी) समांतर रचना यांसारख्या अति महत्त्वाच्या प्रश्नांवर चर्चा करण्यास अवसर सापडला असता.

या लेखनात भासणारी एक उणीव म्हणजे कोठेही निश्चित उपाययोजना व्यंजनेने देखील सुचविलेली नाही. सारे प्रश्न एका 'भावुक आशावादा'वर सोपविलेले दिसतात. महाराष्ट्रेतर प्रांतांत या प्रश्नांचे स्वरूप काय आहे, प्रगती कशी केली गेली आहे याचेही तुलनात्मक विवेचन हवे होते. एकत्र उदाहरण अशा मोघम आशावादाचे द्यायचे तर जीवनशिक्षणावरचे प्रकरण निर्देशित करावे लागेल. लेखक नुसता इतिहास सांगतात, उपराष्ट्रपतींचे ताजे उद्‌गार देतात, अधिकाऱ्यांच्या अश्रद्धेकडे बोट करतात पण खरे विश्लेषण करीत नाहीत. शाळेचे समुदाय-केंद्रात रूपांतर करण्याची कल्पनाही परीक्षून घेतलेली दिसत नाही. ज्या विद्यार्थ्यांच्यासाठी हे पुस्तक सिद्ध झालेले आहे, त्यांच्या पातळीवरुन हे लेखन होणे अगत्याचे होते. एकूण सारा भर काही निवडक अहवाल व शताब्दि ग्रंथ—मुंबई राज्य यावरच दिलेला आहे.

प्राथमिक शिक्षणाची ओझरती ओळख या पुस्तकाने होते. काही प्रश्नांचा केवळ निर्देश होतो. पुढील आवृत्तीत या विवेचनाला वस्तुनिष्ठ विश्लेषणाची जोड देण्यास हे लेखक समर्थ आहेत यात संशय नाही. एक नवा प्रयत्न या दृष्टीने हे स्वागतार्ह आहे यात शंका नाही. प्रवाही भाषेत असा प्रयत्न केल्याबद्दल लेखकांचे अभिनंदन करणे अगत्याचे आहे.

चंद्रकुमार डांगे

## चुकीची दुरुस्ती

संदर्भ—म. सा. पत्रिका अंक १४३ (जाने. ६३) पृ. ४८ स्तंभ १ (मध्य) १·२ कै. मोडक यांनी दिलेली व्युत्पत्ती मुळात 'अर्वाच्य' ची नसून 'अर्वाक्' ची आहे. म्हणून तिचा येथील उल्लेख अप्रस्तुत व पुढील टीका अनाठायी आहे. अनवधानाने झालेल्या या आगळिकीबद्दल खेद वाटतो.

—दा. ल. अडोणी.

अनुक्रमणिका

## झपूर्झा

संपादक : वि. म. कुलकर्णी व गो. म. कुलकर्णी, विदर्भ-मराठवाडा बुककंपनी, पुणे, १९६२, रु. ४.००

केशवसुतांच्या काही निवडक कवितांचा हा संग्रह संपादकांनी फार काळजीपूर्वक संपादित केला आहे. त्यांची ३१ पानांची प्रस्तावना महत्त्वाची आहे, तशाच शेवटी ३५ पाने टीपा आहेत त्या विद्यार्थ्यांना व रसिक वाचकांना उपयुक्त आहेत. मराठी व इंग्रजी कवींच्या संदर्भांमुळे आणि टीकाकारांच्या मतांचा ठिकठिकाणी उल्लेख असल्यामुळे प्रत्येक कविता चांगली समजावून घेणे व तिचे स्वतंत्र चिंतन करणे सुलभ झाले आहे. परिशिष्ट १ म्हणून एका होतकरू कवीला केशवसुतांनी धाडलेले पत्र दिले आहे, व ते त्यांच्या व्यक्तित्वाची फारच स्पष्ट कल्पना देणारे आहे. भाषा, व्याकरण, छंदशास्त्र याविषयी बेफिकीर राहून कवीने चालणार नाही, असे त्यांनी या पत्रात बजाविले आहे, तसेच प्रतिभेच्या अभावी काव्य करणे म्हणजे दिव्याचे चित्र घेऊन लोकांना प्रकाश दाखविण्या-सारखे आहे असे त्यांनी त्याला म्हटले आहे. चांगले-पणाने वागणे व तसे आपण वागतो की नाही याचे प्रत्यंतर आईबापांच्या व इतर लहानमोठ्या सर्व माणसांच्या मुद्रेत प्रथम पाहणे हा उपदेश त्यांनी एका कवीला केला आहे. त्यांची दृष्टी सर्व जीवनालाच मंगल (स्वर्गसम) बनविण्याची होती. काव्याला ते एक आगळाच छंद किंवा अध्यात्म्य मानीत नव्हते तर जीवनाला अर्थ देणारा परीस मानीत होते ही गोष्ट या सुंदर पत्रातून कळते. संग्रहात हे पत्र छापण्याचे औचित्य मला फार पटले व त्याबद्दल संपादकांना धन्यवाद. परिशिष्ट २ मध्ये केशवसुतांचे मूल्यमापन करणारे काही अधिकारी व्यक्तींचे उद्गार आहेत व परिशिष्ट ३ मध्ये गडकऱ्यांची केशवसुतावरील प्रसिद्ध विलापिका आहे. परिशिष्ट ४ मध्ये केशवसुतांच्या काव्याचे ग्रंथ व समीक्षालेख यांची नोंद असून ती अभ्यासकांना उपयुक्त ठरेल.

प्रस्तावनेत, केशवसुतांच्या प्रतिभेने काव्यामध्ये जे दोन आविष्कार साधले त्यांची सुबोध मीमांसा आहे. व्यक्तीला मुक्त करण्यासाठी सामाजिक नियमन बदलले पाहिजे हा एक आविष्कार समकालीन सामाजिक व राजकीय परिस्थितीतून स्वाभाविकपणे कसा झाला हे संपादकांनी विशद केले आहे. केशवसुतांच्या काव्यात्म आविष्काराची दुसरी दिशा चिंतनात्मक आहे व 'उन्मन अवस्थेत जाऊन' चिंतन करणे हा केशवसुतांचा स्थायी-भाव कसा आहे हे त्यांनी चांगले दाखविले आहे. या अनुषंगाने, केशवसुतांच्या काव्यातील 'निराशावाद' आणि 'पृथ्वीला सुरलोकसाम्य' आणू पाहणारा 'आशावाद' या परस्परविरोधी वाटणाऱ्या द्वंद्वाची चिकित्सा आली आहे. वस्तुतः, हे द्वंद्व म्हणजे एकच एक वस्तू (किंवा कल्पना) आहे व छायाप्रकाशाने वस्तूला घनता लाभते त्याप्रमाणे केशवसुतांची निराशा व आशा त्यांच्या जीवनविषयक कल्पनेला घनता प्राप्त करून देते. ते भारतीय मोक्षवादी परंपरेत न बसणारे असे एक श्रेय मानतात. ते श्रेय म्हणजे सुंदर व मंगल असे मानवी जीवन. एका तरल स्वप्नलोकात नांदणारे ते श्रेय आहे व जडाचा, ऐहिकाचा, त्याला स्पर्श सोसवत नाही; पण दुसऱ्याच क्षणी ते श्रेय इहलोकी आपल्या पावलांच्या खुणा उमटवीत जाते. या विलक्षण प्रकारामुळे, केशव-सुतांचे काव्य आध्यात्मिक व गूढात्मक आहे असा वाचताना प्रत्यय येतो. पण त्याचे मूळ श्रेयाच्या तरल व मूर्त, स्वर्गीय व मानवीय, अशा दुहेरीपणात आहे. या द्वंद्वाची मीमांसा संपादकांनी थोडी वेगळी केली आहे.

संपादकांनी केशवसुतांच्या निसर्गकाव्याची आणि कवित्वाच्या उद्दिष्टाची जी मीमांसा केली आहे ती रसिकांना डोळस करणारी आहे. कवीने 'शैशवा'ला जपले पाहिजे याचा अर्थ मला वाटते असा घ्यावा लागतो की वस्तूवस्तूतील सौंदर्य व्यावहारिकतेच्या (म्हणजे 'प्रौढपणाच्या') जड दृष्टीला दिसत नाही व ते पहावयाचे तर निरागस काव्यदृष्टी हवी. केशवसुतांना 'शैशव' या संज्ञेने हे सुचवावयाचे आहे. शिशूचे 'शैशव' त्यांनी व्यंजनेने येथे घेतले आहे. अगदी शब्दार्थाने नाही. 'शिशूचा खेळकरपणा' त्यांच्या वृत्तीत आढळत नाही हे संपादकांचे म्हणणे बरोबर आहे पण ते 'शैशवास जपणे' या कल्पनेशी जुळवून म्हटले आहे ते मात्र बरोबर वाटत नाही.

'सौंदर्यवाद' या शब्दाने काय काय सूचित होते आणि केशवसुत कसे 'सौंदर्यवादी' होते या प्रश्नावर संपादकांची भूमिका थोडक्यात स्पष्ट मांडलेली व ग्राह्य होईल अशी आहे. तसेच, काव्यनिर्मितीच्या तंत्रात केशवसुतांनी केलेले युगप्रवर्तक परिवर्तन या ठिकाणी तपशिलासह नीट विशद केले आहे.

ही प्रस्तावना टीपा आणि परिशिष्टे यांचा संदर्भ घेऊन

मी पुन्हा एकदा साऱ्या कविता वाचल्या आणि केशवसुतांच्या काव्याचा परिचय असणारांनाही हे संदर्भ उपयोगी पडतात असे मला वाटले. प्रथमच केशवसुतांचे काव्य वाचणारांना तर हा संपादित काव्यसंग्रह चांगला मार्गदर्शक ठरेल.

केशवसुतांचे एक विद्यार्थी श्री. द. वें. केतकर यांनी स्मरणाने त्यांचे एक स्केच काढले व त्यात केशवसुतांच्या तोंडवळ्याचे साम्य उतरले आहे असा केतकरांच्या सहाध्यायांचा अभिप्राय पडला. प्रत्यक्ष फोटोच्या अभावी हे चित्र पाहून समाधान मानावे लागेल. ते प्रस्तुत ग्रंथाच्या मलपृष्ठावर मागील बाजूस छापलेले आहे. एकंदरीत परिश्रमपूर्वक संपादनाचा उत्तम नमुना म्हणून या ग्रंथांचे स्वागत करता येईल.

दि. के. बेडेकर

## एकोणिसाव्या शतकांतील महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना भाग १

लेखक व प्रकाशक रा. शं. वाळिंबे
एरंडवणे, पुणे ४
मूल्य १० रु.

'निबंधमाले'च्या पूर्वीचा, महाराष्ट्राचा एकोणिसाव्या शतकातील इतिहास एकत्र उपलब्ध नाही. तो इतिहास लिहिण्यासाठी आवश्यक असणारी साधने विखुरलेली असल्यामुळे व काही काळाच्या उदरात गडप झाल्यामुळे संशोधकास अपार कष्ट घ्यावे लागतात. याचे डॉ. वाळिंबे यांचे 'एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना भाग १' हे पुस्तक ढळढळीत उदाहरण आहे. महापुराच्या तडाख्यात, कष्टाने वेचलेली सामुग्री निकामी झाली, तरी लेखकाने हिय्या धरून परत बरीचशी सामुग्री जुळवली यात डॉ. वाळिंबे यांची संशोधनपरता दिसून येते.

या पहिल्या भागात १८०० ते १८४५ या काळातील इतिहासाचा लेखकाने मागोवा घेतला आहे. तत्कालीन इंग्रजी नियतकालिके आणि मिशनरी, शासनकर्ते अधिकारी व परदेशी प्रवासी यांच्या लिखाणाचा लेखकाने मुख्यत्वे हा भाग लिहिण्यासाठी उपयोग केला आहे. संशोधनात्मक लिखाणाची पथ्ये लेखकाने बारकाईने पाळली आहेत. १८०० ते १८४५ या कालखंडाच्या इतिहासाची सामुग्री मराठी वाचकांना सादर केल्याबद्दल डॉ. वाळिंबे यांचे अभिनंदन करणे अगत्याचे आहे.

या पुस्तकाची महत्त्वाची त्रुटी म्हणजे ते कथनात्मक, वर्णनात्मक आहे, विवेचनात्मक नाही. इंग्रजी नियतकालिके, इंग्रज अधिकारी, पाश्चात्त्य ख्रिश्चन धर्मप्रचारक व प्रवासी यांच्या तोंडून आपण या कालखंडातील काही घटनांचा, व्यक्तींचा व संस्थांचा इतिहास ऐकतो आहो असे पुस्तक वाचताना वाटते. नाही म्हणावयास माडगावकरांचे 'मुंबईचे वर्णन' व ना. वि. जोशी यांचे 'पुणें वर्णन' या एकोणीसाव्या शतकातील मराठी लेखकांच्या पुस्तकांचा डॉ. वाळिंबे यांनी उपयोग केला आहे. या कालखंडातील बहुतेक सामुग्री परकीय लेखकांच्या लिखाणातून मिळते हे जरी खरे असले तरी सामाजिक, आर्थिक व राजकीय घटनांविषयीचा समग्र दृष्टिकोण धरून जर लेखकाने समालोचन केले असते तर सूत्रमय व आशयपूर्ण असा इतिहास त्यांना लिहिता आला असता. या त्रुटीमुळे वर्णिलेल्या कालखंडाचे समग्र चित्र डोळ्यासमोर उभे न राहता ज्या घटनांविषयी, व्यक्तींविषयी व संस्थांविषयी सामुग्री उपलब्ध आहे त्याविषयीची माहिती वाचल्याचेच केवळ समाधान लाभते. इंग्रज लेखकांनी येथील ज्ञानात घातलेली भर, १८१८ पूर्वीचे पुणे, पंचायतव्यवस्था, एल्फिन्स्टन, सती व इतर निर्घृण रूढी, ख्रिस्ती मिशनरी व ख्रिस्ती धर्मान्तराची काही प्रकरणे यांविषयीची सामुग्री या पुस्तकात 'ठेचून' भरली आहे. या सामुग्रीच्या द्वारा तत्कालीन इतिहासाचे सम्यक् दर्शन घडावयास हवे होते. पंचायत ही संस्था कोणकोणत्या प्रांतांत रूढ होती, ती केवळ शासनपद्धती होती का न्यायव्यवस्था होती, ती भारतीय समाजात रूढ असताना अव्वल इंग्रजीत मागे का पडली या प्रश्नांचा ऊहापोह करताना लेखकाचा संभ्रम झाला आहे. तो समग्र दृष्टिकोणाचा अवलंब न केल्यामुळे. एल्फिन्स्टन व त्यानंतरचे अधिकारी यांचा ख्रिस्ती मिशनऱ्यांविषयीचा दृष्टिकोण विशद करताना लेखकाची ओढाताण झाली आहे ती याचमुळे. 'पुनर्घटना' ही पुस्तकाच्या शीर्षकातील संज्ञा हाच वैचारिक संभव दर्शविते. यापुढील भागात समग्र दृष्टिकोणाचा प्रत्यय वाचकास येईल व लेखकाचे संशोधन अधिक अर्थवाही होईल अशी आशा आहे.

ना. र. इनामदार

अनुक्रमणिका

# सुगम मराठी शुद्धलेखन

लेखक : मो. रा. वाळंबे
गो. य. राणे प्रकाशन, टिळकरस्ता, पुणे २ मूल्य ५० न. पैसे

शुद्धलेखनासारख्या रूक्ष विषयात रस घेणारी आणि त्याचा हौसेने पाठपुरावा करणारी जी दुर्मिळ शिक्षकमंडळी आहेत त्यांत श्री. वाळंबे यांचे नाव ठळकपणे लक्षात भरण्यासारखे आहे. शुद्धलेखनावर नियतकालिकांमधून त्यांनी थोडेफार स्फुट लेखन तर केले आहेच, पण या पुस्तिकेपूर्वी म. सा. परिषदेच्या शुद्धलेखनाचा परिचय करून देण्यासाठी एक पुस्तिकाही त्यांनी लिहिली होती. मराठी - साहित्य - महामंडळाच्या नव्या शुद्धलेखनाचा सर्वसाधारण जिज्ञासू वाचकांना आणि विशेषतः प्राथमिक नि माध्यमिक शिक्षकांना परिचय करून द्यावा, म्हणून प्रस्तुत पुस्तिकेचा जन्म झाला आहे. महामंडळाचे नियम आता महाराष्ट्र - सरकारने मान्य केले आहेत आणि महाराष्ट्र शिक्षणखात्याने या नियमांच्या अंमलबजावणीचे आदेशही सर्व शाळांकडे पाठविले आहेत. अशा स्थितीत या नियमांचा सुबोध परिचय शालेय जगाला कोणीतरी करून द्यायला हवाच होता आणि ते काम ही पुस्तिका चांगल्या प्रकारे पार पाडील, असा भरवसा वाटतो.

या पुस्तिकेत शुद्धलेखनाच्या वादाचा स्थूल इतिहास श्री. वाळंबे यांनी दिला आहे; महामंडळाच्या नियमांचे सोदाहरण स्पष्टीकरण केले आहे; निरनिराळ्या शुद्धलेखन-पद्धतींची संक्षिप्त तुलना एका तक्त्यात मांडली आहे. सामान्य चुकांची एक यादी सादर केली आहे आणि लेखन तपासताना उपयोगी पडणाऱ्या खुणा वगैरे गोष्टी थोडक्यात उपलब्ध करून दिल्या आहेत. पुस्तिकेच्या या स्वरूपामुळे ती सर्वसाधारण जिज्ञासूंना आणि शिक्षकांना चांगली उपयुक्त ठरेल यात शंका नाही. महामंडळाच्या शुद्धलेखनाला सरकारी मान्यता मिळाली असली तरी त्याचा वेगवान प्रसार नि सुलभ व्यवहार श्री. वाळंबे यांच्यासारख्यांनी केलेल्या प्रयत्नांमुळेच शक्य होणार आहे.

ही पुस्तिका मुख्यतः संकलनाच्या स्वरूपाची आहे. तीत महामंडळाच्या नियमांची जी स्पष्टीकरणे दिली आहेत ती म. सा. परिषदेने अलीकडेच प्रसिद्ध केलेल्या पुस्तिके-तील स्पष्टीकरणापेक्षा वेगळी दिसली तरी त्यामुळे मूळ नियमावर काही नवा प्रकाश पडतो असे नाही. पण पुस्तिकेचे स्वरूप मुख्यतः संग्रहाचे नि शालेय असल्यामुळे तिच्याकडून अधिक अपेक्षा करणे हेही योग्य होणार नाही. मात्र पुस्तिकेची दुसरी आवृत्ती काढण्याचा जेव्हा योग येईल-आणि हा योग लवकरच यावा-तेव्हा काही भर तीत घालावी, अशी सूचना करावीशी वाटते. उदाहरणार्थ, 'अकारान्त शब्दांचे उपान्त्य इकार व उकार दीर्घ लिहावे' या नियमांचे स्पष्टीकरण गरीब, सून वगैरे शब्दांनी होत असले तरी त्याला एक महत्त्वाचा अपवाद आवर्जून सांगितला पाहिजे. या अकारान्त शब्दांत अंती संयुक्त अक्षर असते किंवा उपान्ती खणखणीत उच्चाराचा अनुस्वार असतो त्या अकारान्त शब्दांत उपान्त्य इकार व उकार दीर्घ नव्हे, तर ऱ्हस्व असतो, हा तो अपवाद होय. उदा. भिल्ल, कुंभ, सुन्न. तसेच संयुक्त अक्षरांची जोडणी करण्या-संबंधी नियम व पद्यातील ऱ्हस्वदीर्घांच्या लेखनासंबंधी नियम पुस्तिकेत अवश्य घालावे. महामंडळाने हे नियम दिलेले नाहीत; कारण ते वादविषय नव्हेत आणि पद्यासंबंधी नियम द्यावे ही महामंडळाची भूमिकाही नव्हती. पण शाळांच्या लेखनव्यवहारात हे नियम पदोपदी लागतात, ते माहीत नसले तर संभ्रम उत्पन्न होतात व म्हणून त्यांची आवश्यकता वाटते. शिवाय महामंडळाच्या नियमांनी मराठीचे लेखन आता पुष्कळ सुलभ होणार असले तरी त्यात तत्सम शब्दांतील इकार-उकार संस्कृताप्रमाणे लिहिण्याचा जो अपवाद आहे तो संस्कृत न जाणणाऱ्या प्रौढांना नि शालेय विद्यार्थ्यांना सारखा नडणार आहे. तेव्हा, मराठीत पुनःपुन्हा येणारे पण ज्यांच्यातील इकार-उकारांचे ऱ्हस्वदीर्घत्व मराठीतील शब्दांपेक्षा वेगळे आहे अशा शब्दांचा एखादा वेचक, छोटा कोशही पुस्तिकेत समाविष्ट करता येण्यासारखा आहे. येथे दुसऱ्या आवृत्तीचा परिपूर्ण आराखडा देण्याचा हेतू नाही; पण ती अधिक उपयुक्त कशी होईल त्यासंबंधी काही दिग्दर्शक सूचना मात्र आपुलकीमुळे केल्या आहेत. त्यांचा लेखकाने जरूर विचार करावा.

या पुस्तिकेचा प्राथमिक नि माध्यमिक शिक्षकांनी डोळसपणे अभ्यास केला, तर ती त्यांना चांगली उपयोगी पडेल आणि त्यांच्या अध्यापनावर त्याचा अनुकूल परिणाम खचित होईल. तेव्हा, विशेषतः शिक्षकवर्गाला या पुस्तिकेची शिफारस केली तर ते उचितच ठरेल.

**द. न. गोखले**

अनुक्रमणिका

# लोकसाहित्य : भाषा आणि संस्कृती

संपादिका--डॉ. सरोजिनी बाबर,
प्रकाशक शिक्षणविभाग, महाराष्ट्रराज्य, पुणे १; मूल्य २ रु.

महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीतर्फे " लोकसाहित्य भाषा आणि संस्कृती' हे प्रकाशन नुकतेच प्रसिद्ध झाले आहे. ह्या पुस्तकात आठ निबंध असून त्या त्या विषयांवरील तज्ज्ञांनी ते लिहिलेले आहेत. लोकसाहित्याची भाषा ही सोपी, सुबोध, लवचिक, वाकणारी, वळणारी, लवणारी असे वर्णन यथार्थ मानले तर, ह्या ग्रंथातील काही निबंधांची भाषा क्लिष्ट, काटेकोर, पंडिती, पढीक स्वरूपाची आहे, असे म्हणावे लागेल. लोकसाहित्यात लोकांची संस्कृती अभिव्यक्त होते हा सिद्धान्त सर्वमान्य आहे. नागर भाषा ताठर असते, उच्चारातही ती तशीच असते असा प्रा. कुलकर्णी ह्यांनी मांडलेला सिद्धान्त सर्वांशी खरा नाही. लोकभाषा काय नागर भाषा काय ह्या दोन्ही वस्तुतः एकत्र आहेत व पाणी ज्याप्रमाणे पात्राचा आकार घेते तसेच जवळजवळ ह्या बाबतीत असते. उच्चाराच्या बाबतीतही आवाज ऱ्हस्व करण्याकडे प्रवृत्ती असल्याने नवे नवे उच्चार स्थानपरत्वे दिसून येतात. एक गोष्ट निश्चित की घरी बोलणारी भाषा व्याकरणाचा अगर अन्यभाषा विषयक नियमांचा तेवढा विचार करत नाही. नागरी लोकही करत नाहीत, व ग्रामीणही करत नाहीत. घरात सदऱ्याची अगर शर्टची सर्व बटने मनुष्य घालत नाही पण रस्त्यावर आल्यानंतर तो अधिक दक्षता घेतो असेच थोडेसे आहे. जेवढे सामाजिक जीवन व्यापक तेवढे लोकसाहित्य व्यापक आहे, व असणे अपरिहार्य आहे.

'स्त्रीगीतांचे शब्दवैभव' ह्या निबंधात जे प्रा. वनहट्टींनी सांगितले आहे, ते अनुभवसिद्ध आहे. "शेजाऱ्याने दिलेले उसने फेडता येते, आईचे फेडता येत नाही" ही गोष्ट " शेजीचे उसने मी फेडिते काडी काडी। नयाचे उसने माझ्या भिनले हाडोहाडी ॥ आईची वृत्ती मुलांच्या हाडाहाडांत भिनली जाते त्याप्रमाणे साऱ्या साहित्यात व लोकसाहित्यातही समाजाची वृत्तीही तशीच भिनलेली असते स्त्रीजीवनातील ठळक ठळक प्रसंगाने येणारे अनुभव लोकसाहित्यातून किती रसज्ञपणे मांडले जातात ह्याची सुंदर उदाहरणे वनहट्टींनी दिली आहेत. जात्यावरच्या ओव्या म्हणजे कौटुंबिक भावकाव्य ही त्यांची व्याख्या मनोज्ञ आहे. लोकसाहित्याचा उदगम अनुभवात आहे कारण सर्व साहित्याचा उद्गम अनुभवात असतो. त्यांतील उपमा रोजच्या अनुभवातल्या; पण रसिक मनच ते शोधू शकते. लहान मुलीला तुपाची फुलवात म्हणणारी प्रतिभा अभिजात आहे. व महाकवींच्या प्रतिभेपेक्षा मी तिला कमी लेखत नाही. लोकसाहित्यांतील विनोद अभिरूचिपूर्ण असतो, असे सामान्यपणे अनुभवाला येते. डॉ. पाटील यांचा निबंध विद्वत्तापूर्ण आहे. तथापि ज्याला लोकभाषा म्हणतात तिचे नियमन व्याकरण करू शकत नाही. तुफान दर्या ज्याप्रमाणे कोणी साठवू शकत नाही, त्याप्रमाणे सतत प्रवाही व वेगवान लोकजीवनावर आधारलेल्या लोकसाहित्याला व्याकरण मानवत नाही. व्याकरणाने भाषेला नियमन येते, लोकव्यवहाराला निश्चितता येते पण पायांत तोडे घातल्याने गती मंदावते व अल्लडपणातील प्रेमळपणा व रमणीयता कमी होते, हेही विसरता कामा नये. लोकसाहित्यातील शब्द अगर भाषा ही लोकाच्या छंदाची प्रतिमा आहे. अणि म्हणून लोकभाषेला मोजावयाचे तर व्याकरणाच्या तराजूने नव्हे. श्री. पोहोनेरकर आपल्या निबंधात म्हणतात त्याप्रमाणे लोकसाहित्य व लोकभाषा ही भाषाशास्त्राकडे बघत नाही. व्यवहार व आवश्यकता ह्या दोन गोष्टी त्यांच्या जडणघडणीला व रूपस्वरुपाला जबाबदार आहे.

श्री. नवरे ह्यांचा निबंध म्हणजे त्यांच्या " म्हणी अनुभवाच्या खाणी" ह्या पुस्तकातील "विशेष" व "विषयप्रवेश" ह्या दोहोंतील सार आहे. पण चटकदार असून त्यात रुची आहे. प्रा. काणेकर यांचा निबंध तुलनात्मक भाषाशास्त्राचा एक भाग म्हणता येईल. प्रा. माळी ह्यांच्या निबंधात लोकसाहित्याचा हुंकार अपरिहार्यतेतून फुटतो. असा सिद्धान्त मांडला आहे; आणि तो सामान्यपणे बरोबर आहे. प्रज्ञेपेक्षा प्रतिभेतून, विचारापेक्षा अनुभवातून लोकसाहित्याचा अंकुर फुटत असतो अगर स्फुरत असतो हे बव्हंशाने खरे आहे. कलेच्या दृष्टीने लोकसाहित्य हे आत्मनिष्ठ नाही, पण आत्मप्रत्ययी असते. आणि तो प्रत्यय कालाच्या प्रत्येक क्षणाला येत असतो. नदी वहात असते पण उगमापासून अंतापर्यंत तो पाण्याचाच प्रवाह असतो. तसेच लोकसाहित्याचे आहे. प्रा. माळी यांचे म्हणणे महाराष्ट्राची लोकसंस्कृती ही श्रमजीवी मराठमोळ्या समाजाची आहे. ह्यात थोडा अव्याप्तीचा दोष आहे. शिवाय ही लोकसंस्कृती व लोकसाहित्य हे कमीजास्त प्रमाणांत समाजातील सर्व लोकांच्या भावनेचे व विचारांचे

अनुक्रमणिका

प्रतिबिंब आहे. त्यात श्रमजीवी येतात, बुद्धिजीवी येतात, गरीब येतात, श्रीमंत येतात, मध्यमवर्गीय पण येतात; म्हणून तिच्यात जातवारी अगर वर्गवारी हिला स्थान नाही. विचारांचे व भावनांचे सामान्यीकरण त्यात आहे म्हणूनच हे साहित्य सर्वप्रिय होते. सर्वांना साद घालते. या साहित्याची पार्श्वभूमी श्रद्धा, शालीनता व सद्भावही आहे. डॉ. सरोजनी बाबर ह्यांचा निबंध वाचनीय आहे. व बरेचसे लोकसाहित्य हे गेय असल्याने त्यातील स्वररचना महत्त्वाची ठरते, आणि हा मुद्दा डॉ. बाबरांनी चांगल्या रीतीने मांडला आहे. हा ग्रंथ चिकित्सक आहे. आणि जे रम्य व रसपूर्ण आहे, त्यातून काही भाषिक सिद्धान्त काढण्याचा हा प्रयत्न आहे, व तो स्तुत्य आहे. लोकसाहित्याच्या अभ्यासकांना हा मार्गदर्शक होईल.

**न. वि. गाडगीळ**

## संदर्भसाह्य–

**लेखक** – वा. पु. कोल्हटकर, त्र्यं. ह. लागू, म. प. पेठे
**प्रकाशक** – महाराष्ट्र ग्रंथालय संघ,
१७२ नायगाव क्रॉसरोड, दादर मुंबई १४.
मूल्य २·५० रु.

महाराष्ट्र ग्रंथालय संघाने गेली १०-१२ वर्षे उन्हाळ्याच्या सुटीत सहा आठवड्यांचा एक ग्रंथपालन–वर्ग चालवून या व्यवसायात पदार्पण करू इच्छिणाऱ्या उमेदवारासाठी आवश्यक ते शिक्षण देण्याचे कार्य चालविले आहे. हा वर्ग मराठी माध्यमातून चालत असल्यामुळे त्यासाठी योग्य अशी मराठी पाठ्यपुस्तके तयार करून घेणे क्रमप्राप्तच होते. याच मालेतील ' संदर्भ-साह्य ' हे चौथे पुष्प असून ' ग्रंथपालनाची तोंडओळख ' हे पाचवे पुष्प होय.

ग्रंथपालनशास्त्राच्या अध्यापनामध्ये ' संदर्भसाह्य ' हा एक स्वतंत्र विषय असतो. ग्रंथालयामध्ये ज्याप्रमाणे कारभाराचे तंत्र ग्रंथपालाला माहीत असावे लागते, त्याचप्रमाणे ग्रंथालयात येणाऱ्या जिज्ञासू वाचकांना व संशोधकांना त्यांच्या वाचनाभ्यासाला आणि संशोधनाला पूरक अशी उपयुक्त पुस्तके, अभ्याससूची व इतर वाचनीये पुरवावी लागतात. हे ज्ञानदानाचे पवित्र काम ग्रंथपाल मोठ्या उत्साहाने व आत्मीयतेने करतो. वाचताना हवे असलेले वाचनसाह्य देण्यासाठी, ग्रंथपालाला ज्या साधनसामग्रीवर अवलंबून राहावे लागते, त्या संदर्भग्रंथांची माहिती, निरनिराळ्या प्रकारच्या संदर्भग्रंथांचे प्रकार, त्यांची रचना, व्याप्ती, प्रतिपादनपद्धती, वैशिष्ट्ये इत्यादींचे विवेचन स्थूलमानाने लेखकांनी या पुस्तकात केलेले आहे. संदर्भसाह्य म्हणजे काय, त्याची व्याप्ती, विकास, उपयुक्तता, संदर्भाचे शीघ्र आणि विलंबित हे प्रकार, संदर्भसाह्य देण्यातील अडचणी या गोष्टींचा परामर्श या पुस्तकात लेखकांनी घेतला आहे. इंग्रजी शब्दांसाठी काही नवीन मराठी शब्द योजून ग्रंथालयीन परिभाषेत नावीन्यपूर्ण शब्दांची भर घातली आहे, उदा० घडिके (पॅम्प्लेटस्), मालिके ( सिरीयल्स्), चक्रमुद्रित ( सायक्लोस्टाइल ) इ० ' संदर्भसाह्य ' या विषयाचे तात्त्विक विवेचन सोडल्यास तपशिलात अनेक उणिवा आढळतात.

संदर्भसाहित्याचे जे प्रकार लेखकांनी सांगितले आहेत (पृ. २१ ), त्यांमध्ये परिषदांचे अहवाल व वृत्तान्त, त्यांमध्ये येणारी माहिती, त्यांची उपयुक्तता व वैशिष्ट्ये, संघसूची (युनियन कॅटलॉग्ज्) वर्णनात्मक हस्तलिखितांची सूची, कालिकामधील लेखांची सूची, निरनिराळ्या ग्रंथालयांच्या सूची, वंशावळी, घराण्याचे इतिहास हे जे संदर्भसाहित्याचे प्रकार आहेत त्यांचा उल्लेख नाही. सरकारी माहिती पुस्तके म्हणजे सिव्हिल लिस्ट असे म्हटले आहे. ( पृ. २४, २६ ) ही माहिती बरोबर नाही. सरकारी माहिती पुस्तके यामध्ये सरकारच्या माहिती

खात्यामार्फत प्रसिद्ध होणारी लहान लहान पुस्तके उदा० योजनेने आपणांसाठी काय केले, पशुसंवर्धन, कुक्कुटपालन इ० आणि सिव्हिल लिस्ट म्हणजे निरनिराळ्या सरकारी खात्यांतील अधिकारी, त्यांची नावे, नोकरीचा काल, वेतनश्रेणी यांची यादी. या सिव्हिल लिस्टा दोन प्रकारच्या असतात. एक राज्य सरकारची व दुसरी केंद्र सरकारची.

ग्रंथसूची या संदर्भग्रंथाचे विवेचन करताना, 'ग्रंथसूचीमध्ये हस्तलिखित...तशीच कालिकांची वा कालिकांतील लेखांची नावे येऊ शकतात' (पृ. ३०) हे विधान सत्यास धरून नाही. ग्रंथसूची, हस्तलिखित ग्रंथांची सूची, कालिकांची व कालिकांतील लेखांची सूची हे सूचींचे प्रकार असून, त्या वेगवेगळ्या असतात. प्रा. शर्मांचे 'बिब्लिऑग्राफी ऑफ मुगल इंडिया' हे अभ्याससूचीचे एक उत्तम उदाहरण म्हणून उल्लेख केला आहे. (पृ. ३५) या ग्रंथनामातील 'बिब्लिऑग्राफी' या शब्दाने 'संदर्भसाह्या'च्या लेखकांची चांगलीच दिशाभूल झालेली दिसते. मराठी भाषेतील ज्ञानकोशांच्या विवेचनात, पं. महादेवशास्त्री जोशी यांच्या संपादननेतृत्वाखाली तयार होत असलेल्या 'भारतीय संस्कृत कोशा'चा उल्लेख असणे जरूर आहे. सर्वसाधारण ग्रंथसूचींची जंत्री म्हणून गर्दे यांच्या 'डिरेक्टरी ऑफ रेफरन्स वर्क्स पब्लिश्ड् इन् एशिया' या उत्कृष्ट मानल्या गेलेल्या सूचींचा उल्लेख, संदर्भसाह्य या पुस्तकात कोठेच आलेला नाही. लेखकसूचीचे उदाहरण म्हणून प्रा. गोडे यांच्या 'थर्टी इयर्स ऑफ हिस्टॉरिकल रीसर्च ऑर बिब्लिऑग्राफी ऑफ् पब्लिश्ड रायटिंग्ज१९१६-१९४४, या ग्रंथाची दखल लेखकांनी घेतली नाही.

'संदर्भसाह्य' या पुस्तकात इंग्रजी व मराठी संदर्भ ग्रंथांची जी यादी दिलेली आहे तीमध्ये अभ्यासकाला उपयुक्त असे अनेक संदर्भग्रंथ आलेले नाहीत. उदा० 'एन्सायक्लोपीडिया ऑफ् इस्लाम ४ खंड, 'एन्सायक्लोपीडिया ऑफ् बुद्धिझम्' 'वर्ल्ड ऑफ् लर्निंग' 'गॅझेटीयर ऑफ् इंडिया अॅन्ड पाकिस्तान, २ खंड', 'भारत अॅटलास', भारतरत्न काणे यांचे धर्मशास्त्राचा इतिहास ५ खंड, मॅकडोनेल, कीथ, डे, विंटरनिझ यांनी लिहिलेले संस्कृत वाङ्मयाचे इतिहास, पं. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी संपादिलेला धर्मकोश, बसू वा कीर्तीकर यांचे 'इंडियन मेडिसिनल प्लँटस्', ४ खंड, मॅनवारिंग यांचे 'मराठी प्राव्हर्ब्ज' डॉ. कानडे यांचे 'प्रयोगक्षम मराठी नाटके', गोरे यांची रामायणावरील अभ्याससूची, अशी अनेक संदर्भ पुस्तके लेखकांच्या नजरेतून सुटलेली आहेत, व ज्यांना संदर्भ ग्रंथ केव्हाही म्हणता येणार नाहीत अशी पुस्तके संदर्भग्रंथांच्या यादीत घातली आहेत. उदा० जादूगार रघुवीर यांचे मी पाहिलेला रशिया, प्रवासी जादूगार, स्वराज्य साप्ताहिकाचे अंक, नातू यांचा जगाचा इतिहास, सु. पगार यांचे गृहविज्ञान इत्यादी अनेक अनावश्यक पुस्तकांच्या नोंदी या 'संदर्भसाह्य' म्हणून वाचनाला उपयुक्त म्हणावयाच्या झाल्यास 'ग्रंथसूची'तील सर्व पुस्तकांची नोंद करावी लागेल.

निरनिराळ्या प्रकारच्या ग्रंथालयांत अनेक तऱ्हेचे संदर्भग्रंथ उपयोगी पडतात. ग्रंथपालाने कोणते संदर्भग्रंथ, कोणत्या दर्जाच्या वाचकांना उपयुक्त आहेत याची माहिती घेऊन, ते संदर्भ ग्रंथ विश्वसनीय व अद्ययावत् आहेत किंवा नाहीत याचा शोध करणे जरूर आहे संदर्भसाह्य याची कल्पना केवळ वाचकांना वाचनीये देऊन साह्य करणे ही आज राहिलेली नाही. तसेच संदर्भाचा जो विलंबित संदर्भ म्हणून प्रकार आहे तो शीघ्र करण्यासाठी जे प्रयत्न चालू आहेत, त्यामध्ये भारतामध्ये दिल्ली येथे इन्सडॉकतर्फे जे कार्य चालू आहे याची लेखकांना काहीच कल्पना नसावी असे कसे म्हणावे ? या पुस्तकातील मुद्रणदोष मात्र जागोजागी खटकतात.

**व. भि. बेलसरे**

## गंधखुळी

कवयित्री—सौ. निर्मला देशपांडे
परचुरे प्रकाशन मुंबई, १९६२, रु. २.५०

ह्या काव्यसंग्रहातील २१ कविता कवयित्रीच्या सौंदर्यासक्त दृष्टीचे आणि हळुवार भावनेचे मूर्तीकरण करण्याच्या कौशल्याचे प्रत्यंतर देतात. कवितांवर जुन्या स्त्रीगीतांची छाया आणि नव्या प्रणयकवितेचे आतुर व धीट आविष्काराचे संस्कार आहेत. नाजुक, मोजके आणि बोलके शब्द या कवितांतील भावनांना नेटकेपणाने साकार करतात. 'पुस्तक', 'घासाघीस' अशा काही कवितांतून काव्यसौंदर्य आढळत नाही, चुटकेवजा विनोद दिसतो. पण या कविता मोजक्याच आहेत.

**दि. के. बेडेकर**

अनुक्रमणिका

# ग्रंथपालनाची तोंडओळख

लेखक – र. श. पारखी
प्रकाशक—महाराष्ट्र ग्रंथालय संघ
१७२ नायगाव क्रॉसरोड, दादर, मुंबई १४
मूल्य २–५० रु.

महाराष्ट्र ग्रंथालय संघ जसा ग्रंथपालांसाठी वर्ग चालवितो तसाच खेडोपाडी व लहान शहरांतील ग्रंथालय प्रेमी व्यक्तींसाठी ग्रंथपालनशास्त्राची थोडक्यात ओळख करून देण्याकरिता आठ दिवसांची ग्रंथपालन शिबिरे भरवितो. प्रामुख्याने अशा शिबिरासाठी '**ग्रंथपालनाची तोंडओळख**,' हे पुस्तक संघाने प्रसिद्ध केले आहे. या पुस्तकाचे लेखक **श्री. र. श. पारखी** यांनी २० वर्षांपूर्वी 'ग्रंथालयशास्त्राचा ओनामा' हे पुस्तक लिहिले होते. गेल्या २० वर्षांत या शास्त्रात जी प्रगती झाली आहे ती जमेस धरून सामान्य वाचकाला ग्रंथपालनशास्त्र समजावून घेण्याच्या दृष्टीने हे पुस्तक अत्यंत उपयुक्त ठरेल यात शंका नाही.

छोट्यामोठ्या २१ प्रकरणांतून ग्रंथपालाला लागणारी माहिती येथे ठासून भरण्याचा लेखकाचा प्रयत्न दिसतो. वर्गीकरणांच्या पद्धती, सूचींचे प्रकार, देवघेव पद्धती, फलकपरिशोधन, ग्रंथालय–कायदा वगैरे बाबतचे विवेचन अद्ययावत असले तरी हे विवेचन वाचताना एक प्रश्न सारखा मनात डोकावतो. तो म्हणजे ग्रामीण किंवा छोट्या ग्रंथालयांतील कार्यकर्त्यांच्या आठवड्याच्या शिबिरासाठी इतक्या माहितीची जरुरी आहे का? ग्राम ग्राम व ती इतक्या थोड्या अवधीत देता येते का? किंवा छोट्या ग्रंथालयांचे प्रश्न वेगळेच असतात. शास्त्रीय सर्वकष चर्चेपेक्षा एखादी व्यवहार्य व सुटसुटीत योजना त्यांना हवी असते. दशांश व द्विबिंदू वर्गीकरणाच्या पद्धतींचे विवेचन झाल्यानंतर सर्वसामान्य काही पुस्तकांना वर्गांक कसे द्यावयाचे याची काही उदाहरणे दिली असती तर बरे झाले असते. केवळ शास्त्रावर भर अधिक न देता वाचकांची सेवा व ग्रंथालयांची परिस्थिती यांची सांगड घालण्यासाठी काय करावे याचे मार्गदर्शन करणारे एखादे प्रकरण यात अवश्य हवे होते. डॉ. रंगनाथन् यांनी आपल्या उपोद्घातात म्हटल्याप्रमाणे सदर पुस्तक म्हणजे 'ग्रंथालयशास्त्राचा एक चिमुकला ज्ञानकोश' हे एका अर्थाने खरे असले तरी 'ग्रंथपालनाची तोंडओळख' हे या पुस्तकाला दिलेले नाव तितकेसे सार्थ वाटत नाही. श्री. पारखी हे ग्रंथालयशास्त्रातील एक मुरब्बी लेखक व अनुभवी ग्रंथपाल आहेत. त्यांच्या ज्ञानाचा फायदा महाराष्ट्र ग्रंथालय संघाने या पुस्तिकेच्या द्वारा सामान्य वाचकाला व ग्रंथालय जिज्ञासूंना करून दिल्याबद्दल धन्यवाद.

—मो. रा. वाळंबे

---

**महत्त्वाच्या सूचना**

१ परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुका या वर्षअखेर होणार आहेत.
२ सभासदत्वाची एक वर्षाची वर्गणी थकली असल्यास या निवडणुकीत मताधिकार राहणार नाही. थकलेली वर्गणी त्वरित पाठवावी.
३ सभासदत्वाची वार्षिक वर्गणी आता ५ रु. झाली असून तहहयात वर्गणी १०० रु. झाली आहे.
४ ज्यांना पत्त्यांत काही बदल करावयाचा असेल त्यांनी तसे त्वरित कळवावे.

अनुक्रमणिका

# प रि ष द -- वा र्ता

( चिटणिसांकडून )

**स्मृतिदिन**—ज्ञानकोशकार कै. डॉ. श्री. व्यं. केतकर यांचा स्मृतिदिन यंदा १० एप्रिलला सकाळी कमला नेहरू उद्यानात या वर्षी विशेषप्रकारे साजरा झाला. या उद्यानात पुणे महानगरपालिकेने केतकर-स्मारकासाठी जी जागा दिली त्या ठिकाणी निमंत्रितांच्या उपस्थितीत कै. केतकर यांच्या अस्थींचा समंत्रक निक्षेप करण्यात आला व नंतर पुष्पांजली वाहण्यात आली. समारंभाला महापौर श्री. बाबुराव जगताप, कमिशनर श्री. स. बा. कुलकर्णी, असि. कमिशनर श्री. खोपकर, डॉ. द. न. गोखले श्री. रामदास परांजपे, श्री. शीलवतीबाई केतकर, श्री. दुर्गा भागवत, श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, श्री. य. रा. दाते, प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. दि. के. बेडेकर, प्रा. गं. बा. सरदार इत्यादी मंडळी उपस्थित होती. महापौर जगताप, प्रा. क्षीरसागर व श्री. दुर्गा भागवत यांनी प्रसंगोचित भाषणे केल्यावर चिटणीस वि. व्यं. शेटे यांनी महापालिकेचे आजीमाजी महापौर, अधिकारीवर्ग, श्रीमती केतकर इत्यादींचे आभार मानले. सायंकाळी ६॥ वाजता प्रा. भीमराव कुलकर्णी यांचे परिषदेच्या सभागृहात 'डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या' या विषयावर व्याख्यान झाले.

१३ एप्रिलला सायंकाळी कै. बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांच्या स्मृतिदिनी डॉ. के. ना. वाटवे यांच्या अध्यक्षतेखाली सभा झाली. या सभेत प्रा. चंद्रकुमार डांगे, प्रा. भा. वि. काळे, सौ. सुंदराताई करमरकर इत्यादींची भाषणें झाली.

२० जुलै हा कै. वा. म. जोशी यांचा स्मृतिदिन. या दिवशी सायंकाळी प्रा. डॉ. वि. रा. करंदीकर ( फर्ग्युसन कॉलेज ) यांचे 'वामन मल्हार : व्यक्ती आणि वाङ्मय' या विषयावर 'चिपळूणकर सभागृहा'त व्याख्यान झाले.

**सभा-सत्कार-भेटी**—सुप्रसिद्ध नाटककार व साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष श्री. भा. वि. ऊर्फ मामा वरेरकर यांच्या ८१ व्या वाढदिवसानिमित्त परिषदेने शनिवार दि. १५ जूनला देवी रमाबाई सभागृहा। त्यांचा प्रकट सत्कार केला. श्री. काकासाहेब गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या सत्कारसभेत श्री. वि. द. घाटे, सौ. ज्योत्स्नाबाई भोळे, श्री. के. नारायण काळे, डॉ. रा. शं. वाळिंबे व नटवर्य श्री. नानासाहेब चाफेकर यांची समुचित भाषणे झाली. प्रस्तुत सत्कार-समारंभात पुण्यांतील पुढील संस्था सहभागी झाल्या होत्या. मराठी नाट्य परिषद-पुणे शाखा, भरत नाट्य संशोधन मंदिर, मराठी ग्रंथसंग्रहालय, देशमुख आणि कंपनी, ठोकळ प्रकाशन, व्हीनस प्रकाशन, कॉंटिनेंटल प्रकाशन, जोशी-लोखंडे प्रकाशन, सुविचार प्रकाशन आणि प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोशिएशन.

श्री. वरेरकर यांच्या सत्कारानिमित्त सकाळी सेवासदनाच्या सभागृहात पुण्यातील व पुण्याबाहेरील काही साहित्यिकांचे एक अनौपचारिक स्नेहसंमेलन भरविण्यात आले होते. संमेलनाला सुमारे ७५ साहित्यिक व साहित्यप्रेमी मंडळी उपस्थित होती. 'जुनी आणि नवी रंगभूमी' या विषयावर संमेलनात चर्चा झाली चर्चेत श्री. मामा वरेरकर, श्री. काकासाहेब गाडगीळ, श्री. के. नारायण काळे, श्री. वि. द. घाटे, प्रा. ग. प्र. प्रधान, प्रा. ह. श्री. शेणोलीकर, प्रा. भीमराव कुलकर्णी, प्रा. श्री. बा. रानडे, प्रा. गं. बा. सरदार, प्रा. दि. के. बेडेकर, प्रा. म. ना. अदवंत, प्रा. वि. म. कुलकर्णी, श्री. म. म. केळकर इत्यादींनी भाग घेतला होता. खेळीमेळीच्या वातावरणात झालेल्या या उद्बोधक चर्चेनंतर सर्वांचा भोजनाचा एकत्रित कार्यक्रम झाला.

दि. २१ जुलै रोजी सकाळी १० वाजता महाराष्ट्र राज्याचे मुख्य मंत्री श्री. मा. सां. कन्नमवार यांनी परिषदेस भेट दिली. श्री. काकासाहेब गाडगीळ यांच्या हस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला. सत्कारप्रसंगी प्रा. ना. सी. फडके, प्रा. क्षीरसागर, श्री. य. रा. दाते. प्रा. सरदार, डॉ. सरोजिनी बाबर, श्री. शंकरराव उरसळ, डॉ. वाटवे इत्यादी मंडळी उपस्थित होता.

अनुक्रमणिका

माजी संमेलनाध्यक्ष प्रा. न. र. फाटक यांच्या वयाला ७० वर्षे पूर्ण झाल्याबद्दल ११ ऑगस्ट रोजी परिषदेतर्फे त्यांचा मा. प. सभागृहात अनौपचारिकरीत्या सत्कार करण्यात आला.

**कै. टेंबे स्मारक व्याख्याने**—कोल्हापूरचे श्री. टेंबेबंधू यांच्या देणगीतून प्रतिवर्षी चालू असलेली कै. गोविंदराव टेंबे व्याख्यानमाला यंदा कोल्हापूर येथे २४ ते २६ जून अशी तीन दिवस नागपूरचे प्राध्यापक-कवी श्री. भवानीशंकर श्रीधर पंडित यांनी गुंफिली. श्री. वि. स. खांडेकर यांच्या अध्यक्षतेखाली राजाराम कॉलेजच्या सभागृहात झालेल्या या व्याख्यानमालेत प्रा. पंडित यांनी पुढील तीन विषयांवर उद्बोधक व्याख्याने दिली. (१) मराठी साहित्यातील स्थित्यंतरे (१३ते२०वे शतक), (२) आधुनिक कविता (१८८५ ते १९२०) आणि (३) मराठी रंगभूमीचे अर्धशतक (१८८० ते १९३०). व्याख्यानमालेच्या व्यवस्थेसाठी परिषदेचे एक चिटणीस प्रा. अ. गं. मंगरूळकर कोल्हापूरला गेले होते. श्री. टेंबेबंधू, प्राचार्य ढेकणे व प्रा. भगवंत देशमुख यांच्या सहकार्यामुळे यंदाची माला यशस्वी झाली.

**अतिथिभवन**—परिषदेने हाती घेतलेल्या अतिथिभवनाच्या बांधकामाचा शुभारंभ म्हणून अक्षय्यतृतीयेला (२६ एप्रिल) अध्यक्ष श्री. काकासाहेब गाडगीळ यांच्या हस्ते भूमिपूजनाचा समारंभ परिषदेच्या आवारात झाला. भवनाचे बांधकाम लवकरच सुरू होईल. आतापर्यंत भवनासाठी २२,६०५ रुपयांची रक्कम गोळा झाली आहे. दिल्ली बृहन्महाराष्ट्रीय समाज बिल्डिंग ट्रस्टने या अतिथिभवनासाठी १५००० रु.ची देणगी देण्याचे ठरविले आहे. अतिथिभवनास 'दि दिल्ली बृहन्महाराष्ट्रीय समाज बिल्डिंग ट्रस्टचे अतिथिभवन' असे नाव देण्यात यावयाचे आहे.

**घटनाबदल**—परिषदेची वार्षिक साधारण सभा १६ जून १९६३ रोजी श्री. न. वि. गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. या सभेत जमाखर्च, ताळेबंद, अर्थसंकल्प पत्रके संमत करण्यात आली व प्रा. श्री. के. क्षीरसागर यांचा कार्याध्यक्षपदाचा राजीनामाही संमत करण्यात आला.

१० जून १९६२ रोजीच्या सभेने परिषदेच्या घटना-दुरुस्तांचा जो खर्डा संमत केला त्या सभेचा वृत्तान्त वरील वार्षिक सभेने मंजूर केला. नवी घटना १ एप्रिल १९६३ पासून अमलात आली आहे. आता या दुरुस्त खर्ड्यानुसार परिषदेच्या घटनेत पुढील महत्त्वाचे बदल झालेले आहेत: परिषद ही 'मराठी साहित्य महामंडळ' या मध्यवर्ती प्रातिनिधिक साहित्यसंस्थेची घटकसंस्था म्हणून यापुढे कार्य करील. तिचे घटनात्मक कार्यक्षेत्र मुंबई, विदर्भ व मराठवाडा हे विभाग वगळून गोव्यासह उर्वरित पश्चिम महाराष्ट्रापुरते मर्यादित राहील. या कार्यक्षेत्राबाहेरील सर्व तहहयात सभासद हे पूर्ववत मतदार सभासद म्हणून राहतील व साधारण सभासद 'पत्रिके'चे वर्गणीदार म्हणून राहतील. **तहहयात सभासदत्वाची वर्गणी १०० रु. व साधारण सभासदत्वाची वर्गणी ५ रु. राहील.** (परिषदेच्या घटनेचा संपूर्ण नवा मसुदा 'पत्रिके'च्या पुढील अंकात प्रसिद्ध होईल.)

**संशोधन**—अनुभवामृताचे संशोधन पूर्ण होत आले आहे. मुद्रणप्रत तयार होत आहे. या संशोधनामुळे अनेक ओव्यांचे अर्थ सुसंबद्ध करता येतील व ज्ञानदेवांचे याबाबतीतील म्हणणे स्पष्ट होईल. संशोधन विभागातर्फे मराठीतील पदांची सूची तयार करण्याचे काम सुरू झाले आहे. सौ. कुसुम बेडेकर या कामी सहकार्य करीत आहेत.

**ग्रंथालयास देणगी**—परिषदेचे सदस्य प्रा. ना. म. पटवर्धन, श्री. केशवराव भोळे, प्रा. सौ. तारा घुमटकर व प्रा. नी. वा. किंकर यांनी आपल्या जवळील काही उपयुक्त पुस्तके व नियतकालिके परिषदेच्या ग्रंथालयाला भेट म्हणून दिली, याबद्दल परिषद त्यांची आभारी आहे.

---

अनुक्रमणिका

# सा भा र – स्वी का र

१ **क्षीरसागर पंडित – मालती माझी आहे :**
कुलकर्णी ग्रंथागार, पुणे२; २=५०
( श्री. क्षीरसागर यांच्या तेरा कथांचा पहिलाच संग्रह )

२ **काळे श्रीपाद – पिसाटवारा :**
मॅजेस्टिक बुक-स्टॉल, मुंबई ४; ५=००
( श्री. काळे यांची पाचवी कादंबरी. )

३ **तल्हार मनोहर – माणूस :**
मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; १०=००
( वाचकांच्या अपेक्षा वाढविणारी श्री. तल्हार यांची प्रभावी कादंबरी. )

४ **दळवी जयंत – चक्र :**
मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ५=००
गंभीर समाजदर्शन आणि भेदक शैलीने नटलेली कादंबरी )

५ **संजीव – प्रियंवदा :**
कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; ४=००
( कवी संजीव यांच्या पन्नासाव्या वाढदिवसप्रसंगी प्रसिद्ध झालेला काव्यसंग्रह. )

६ **सुर्वे नारायण – ऐसा गा मी ब्रह्म :**
अभिनव प्रकाशन, मुंबई १२; २=५०
( श्री. सुर्वे यांच्या ओजस्वी व भावपूर्ण कवितांचा पहिलाच संग्रह. )

७ **साद** : अहमदनगर जिल्हा कवि-मंडळ, अहमदनगर; २=००
( नगर जिल्ह्यातील जुन्या-नव्या कवींचा प्रातिनिधिक संग्रह. )

८ **किर्लोस्कर अण्णासाहेब - सौभद्र :**
माणिक लल्वाणी, पुणे २; १=७५
( प्रा. भीमराव कुलकर्णी यांनी संपादिलेली आवृत्ती. )

९ **सुव्रत - पौलोमी :**
पु. धुं. मालेराव, पुणे ४; ३=०० ( प्राचीन भारतातील एका घटनेवर आधारलेले नाटक )

१० **खरशीकर : स्मृतिगंध– डॉ. प्र. न. जोशी,**
मातृभक्ति-मंडळ, पुणे २; २=००
( कै. नरहरशास्त्री खरशीकर यांच्या निकटवर्तियांनी वाहिलेली आदरांजली. )

११ **इनामदार न. ल., व सुभेदार ल. मा. – 'लोकशिक्षणकार' जांभेकर**
व्यक्तिमत्त्व – आणि कार्य : डॉ. ना. भा. गुर्जर, १२ नारायण पेठ, पुणे २; ७=००
( श्री. जांभेकर यांच्यासंबंधी गुणज्ञांचे लेख व आठवणी. )

१२ **भिडे नी. वि., व भिडे स. म. :**
**म्हसकर परिचय** : सौ. सीताबाई म्हसकर, अमळनेर, विनामूल्य.
( कै. वि. शी. ऊर्फ डॉ. अण्णासाहेब म्हसकर यांच्या घराण्यातील व्यक्तींचा परिचय. )

१३ **गाडगीळ न. वि. – पाव नि मिसळ :**
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; ५=००
(श्री. गाडगीळ यांच्या वैचारिक ललितलेखांचा संग्रह. )

१४ **पानसे मु. ग. – यादवकालीन महाराष्ट्र**
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, १७२ नायगाव क्रॉसरोड, दादर, मुंबई १४; २=०० ( यादवकालीन महाराष्ट्राचे सर्वांगीण दर्शन घडविणारा साधार ग्रंथ )

१५ **काव्यविहारी ( धों. वा. गद्रे )–देवल : व्यक्ति आणि वाङ्मय** : के. वा. जोशी, पुणे२;७=००
( कै. देवलांचे चरित्र व नाट्यवाङ्मय यांचे रसोद्ग्राही विवेचन. )

१६ वाटवे के. ना. – **नगाधिराज हिमालय,**
वोरा अँड कं. मुंबई २, १=२५
( संस्कृत वाङ्मयाच्या आधारे घडविलेले हिमालयाचे रुचिरदर्शन.)

१७ जोशी स. कृ. – **कळसाची चमक :**
वोरा अँड कं. मुंबई २; २=००
( भक्तिरसाने ओथंबलेले देव-संतविषयक भावपूर्ण लेख )

१८ वझे वा. ल. – **शुभमंगल झाले :**
गोकुळ मासिक-प्रकाशन, पुणे २, २=५०
( विवाहसंस्काराची सविस्तर माहिती देणारे सुबोध पुस्तक. )

१९ वावर सरोजिनी – **जा माझ्या माहेरा :**
महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य माला, पुणे १, ३=५०
( सासर माहेरविषयक लोकगीतांचे व इतर साहित्याचे साक्षेपी संपादन. )

२० वीरकर – गद्रे – सामंत– **प्रायोगिक शैक्षणिक मानसशास्त्र :** ठोकळ प्रकाशन, पुणे २, ८=००
( प्रायोगिक मानसशास्त्र, संख्याशास्त्र व मानसिक कसोट्या या विषयांची सुगम चर्चा. )

२१ मंगुडकर मा. प. – **शिंदे लेखसंग्रह :**
ठोकळ प्रकाशन; पुणे २; १२=००
(कर्मवीर शिंदे यांच्या विविध लेखांचे साक्षेपी संपादन)

२२ **स्वामी विवेकानंद ह्यांचे समग्र ग्रंथ : खंड २१**
कर्नाटक प्रकाशन संस्था मुंबई २; ३=०० ( प्रत्येकी ),
( कै. ग. वा गोगटे यांनी अनुवादिलेले व श्री. गं. दे. खानोलकर यांनी संपादिलेले विवेकानंद विषयक खंड )

२३ वाडेकर दे. द. व हरोलीकर ल. व.
**तर्कशास्त्राची मूलतत्त्वे भाग १ : निगमन,**
सरस्वती प्रकाशन, पुणे २; १५=००
( पारंपरिक पाश्चात्त्य निगामी तर्कशास्त्रातील विविध विषयांची समग्र, सोपपत्तिक व विवेचन चर्चा करणारा ग्रंथ. )

२४ देशपांडे बालशंकर – **ललित लेखनाचे तंत्र :**
साहित्य रसमाला प्रकाशन, मुंबई ४; ४=००

२५ सिनिक – **सिनिकच्या कथा :**
मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद, ३=५०
( श्री. सिनिक यांच्या वैशिष्ट्यपूर्ण भेदक कथांचा संग्रह )

२६ दीक्षित म. श्री. – **मराठी वाङ्मयदर्शन :**
पुष्प १२ ( सावरकर )
अ. वि. गृह प्रकाशन, पुणे २; २ = ५०
( सावरकरांच्या गद्यपद्य साहित्यातील उत्कृष्ट वेचे )

———

# नवीन सभासद

### तहहयात

प्रा. मं. वि. राजाध्यक्ष, मुंबई.

### साधारण

१ श्री. का. म. पवार, सोलापूर.
२ सौ. अंजली अ. अरगडे, पुणे ४.
३ श्री. प. आ. पुरोहित, ठाणे.
४ श्री. वा. स. साठे, पुणे २.
५ प्रा. म. सु. पाटील, मालेगाव कँप ( नाशिक ).
६ प्रि. फादर एम्. डिसोझा, मनमाड.
७ प्रा. अ. रा. केळकर, पुणे २.
८ श्री. श. गो. तळवलकर, येडशी ( सोलापूर ).
९ श्री. खं. म. खंडागळे, बारामती.
१० श्री. मा. द. वैद्य, सोलापूर.
११ श्री. म. पु. केंदूरकर, पुणे २.
१२ श्री. विद्या य. जावडेकर, पुणे २.
१३ डॉ. श्री. बा. लागू, पुणे २.
१४ श्री. आ. य. यादव, परंडा ( उस्मानाबाद ).
१५ सौ. कमल गोपाळराव देवळे, मनमाड.
१६ श्री. सु. वि. पुरंदरे, अकोला.
१७ सौ. कुसुम पु. कोकीळ, पुणे २.
१८ श्री. ना. धों. महानोर, जळगाव.
१९ श्री. रा. श्री. बनहट्टी, पुणे २.
२० श्री. उषा अक्षीकर, मुंबई १४.
२१ श्री. ग. ना. पडवळ, पुणे २
२२ सौ. सुनीती शि. जोशी, पुणे २.
२३ सौ. लीला जावडेकर, चिकुर्डे ( सांगली ).
२४ श्री. म. गं. भागवत, सातारा.
२५ श्री. ना. ग. देशपांडे, सातारा.
२६ श्री. श्री. स. गोसावी, सातारा.
२७ श्री. एस. व्ही. कुलकर्णी, सातारा.
२८ सौ. सिंधुताई गोगटे, सातारा.
२९ श्री. द. श्री. देऊरकर, सातारा.
३० श्री. व्ही. वी. अरगडे, सातारा.
३१ श्री. चंद्रकांत अडावदकर, सातारा.
३२ श्री. शं. ब. सुखटणकर, सातारा.
३३ प्रा. एस्. एस्. भोसले, सातारा.
३४ प्रा. दि. मो. हातवळणे, सातारा.
३५ श्री. म. रा. ताटके, सातारा.
३६ श्री. श्री. मा. अभ्यंकर, सातारा.

## माहितीचे निवेदन

वृत्तपत्रांच्या नोंदणी नियमाप्रमाणे ( केंद्रीय १९५६ ) म. सा. पत्रिका त्रैमासिकाविषयी व इतर तपशीलासंबंधी माहितीचे निवेदन-तक्ता ४: नियम ८ अनुसार-

१ प्रकाशन स्थळ – टिळक रस्ता, पुणे २

२ प्रसिद्धीचा काल – त्रैमासिक ( एप्रिल, जुलै, आक्टोबर, जानेवारी, )

३ मुद्रकाचे नाव – वि. ग. माटे पत्ता – विश्वकर्मा मुद्रणालय, ३९५ टिळक रस्ता, पुणे २
राष्ट्रीयत्व – भारतीय
पत्ता – ३९५ टिळक रस्ता, पुणे २

४ प्रकाशकाचे नाव – वि. त्र्यं. शेटे, चिटणीस महाराष्ट्र साहित्य परिषद
राष्ट्रीयत्व – भारतीय
पत्ता – म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणे २

५ संपादकाचे नाव – श्री. वा. रा. ढवळे, डॉ. वि. म. कुलकर्णी, प्रा. कुं. ब. निकुंब व श्री. मो. रा. वाळंबे,
राष्ट्रीयत्व भारतीय
पत्ता – महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे २

एकूण भांडवलाच्या एक टक्याहून अधिक भांडवल घातलेल्या भागीदार व्यक्तींसह वृत्तपत्राच्या मालकांची नांवे व पत्ता – मालकी, महाराष्ट्र साहित्य परिषद, ( ट्रस्ट ) टिळक रस्ता, पुणे २.

मी विश्वनाथ त्र्यंबक शेटे, चिटणीस म. सा. प. जाहीर करतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती प्रमाणे व समजुतीप्रमाणे बरोबर आहे.

वि. त्र्यं. शेटे,
चिटणीस म. सा. प.
प्रकाशक

अनुक्रमणिका

महाराष्ट्र–साहित्य–परिषद

# प्रकाशने



| | | |
|---|---|---|
| १ | मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभाव अखेर )<br>कै. वा. अ. भिडे | |
| २ | म. सा. परिषद्–इतिहास<br>द. वा. पोतदार | ३·०० |
| ३ | द्रौपदीस्वयंवर ( अवचितसुत-काशीकृत )<br>संपादक – वा. दा. गोखले | ५·०० |
| ४ | संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुती ( द्वितीयावृत्ती )<br>गं. बा. सरदार | ३·०० |
| ५ | शास्त्रीय परिभाषा कोश<br>संपादक – आपटे व जोशी | ६·०० |
| ६ | वाङ्मयीन वाद ( पुरस्कृत ) | ३·०० |
| ७ | सारस्वत प्रवेश ( प्रथमा परीक्षेकरिता ) | २·०० |
| ८ | साहित्यसुगंध ( प्रवेश परीक्षेकरिता ) | ३·०० |
| ९ | निबंधविकास ( प्राज्ञ परीक्षेकरिता ) | २·५० |
| १० | लेखनविषयक नियम ( मराठी साहित्य महामंडळ ) | ०·१५ |

क्र. ४ व ६ या पुस्तकांची मागणी अनुक्रमे मॉडर्न बुक डेपो, पुणे २. व प्रसाद प्रकाशन, पुणे २ यांच्याकडे करावी. इतर मागणी खालील पत्त्यावर

चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद,

टिळक रस्ता, पुणे २.

मुद्रक : श्री. वि. ग. माटे, विश्वकर्मा मुद्रणालय, ३९५ टिळक रस्ता, पुणे २
प्रकाशक : श्री. वि. त्र्यं. शेटे, चिटणीस म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणे २

